Bharata Itihasa Samshodhaka Mandala.
*Svīya-grantha-mālā No. 41.*
भारत-इतिहास-संशोधक--मंडळ.
स्वीयं ग्रंथमाला क्र. ४१.

# दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाचीं साधनें.

## खंड २ रा.

# Sources of The Medieval History of the Dekkan.

## Vol. II

BY
**Ganesh Hari Khare.**

लेः– गणेश हरी खरे.

१८५६ ] किंमत २ रु. Price 2 Rs. [ A. D. 1934

# प्रस्तावना

प्रस्तुत पुस्तक हा दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाची साधनें या मालेचा दुसरा खंड आहे. यांत १३ प्रकरणें असून २० साधनाचा परामर्ष घेतला आहे. यांत ४ ताम्रपट व १२ शिलालेख यांची मूळें दिली आहेत व राहिलेल्या ४ साधनांवर टिपणें लिहिली आहेत. या ४ साधनापैकी दौलताबाद ताम्रपटाचें मूळ इतरत्र प्रसिद्ध झालेलेंच आहे. उरलेल्या तीन साधनांची मूळें मी देऊं शकलों नाही.

या पुस्तकात जे ताम्रपट शिलालेख प्रसिद्ध झाले आहेत त्याची मूळें किंवा ठसे हे मंडळाच्या संग्रहात आहेत. अभ्यासूंना ते केव्हांही पहावयास मिळतील.

या खंडात ज्या ताम्रपटशिलालेखांची मूळें दिली आहेत ते सर्व पहिल्या खंडाप्रमाणे नवीन आहेत. त्यांची मूळें इतरत्र कोठेंही प्रसिद्ध झालेली नाहीत. फक्त असोगें ताम्रपट ( प्रकरण क्र. १३ ) पहिल्या खंडात प्रसिद्ध झाला आहे. पण त्यावेळी तो केवळ मजकडे आलेल्या वाचनावरून प्रसिद्ध केला होता. पुढें तो ताम्रपटच प्रत्यक्ष मंडळसंग्रहात दाखल झाला. तेव्हा मूळ व मजकडे आलेलें वाचन यात मोठी तफावत पडलेली दिसून आली. अर्थात् त्याचें सुधारलेलें वाचन देणें भागच झाले. एपिग्राफिया इंडिका सारख्या अव्वल दर्जाच्या नियतकालिकांतही असे प्रसंग आलेले आहेत. उदाहरणार्थ, अमगाची ताम्रपट घ्या. याचें प्रसिद्धीकरण अनेकदां झालेलें आढळतें.

यात आलेल्या साधनांचें वर्गीकरण केल्यास तीं कालदृष्ट्या श. ७३२ व १५२० या दोन शकामधील आहेत. भाषेच्या दृष्टीनें पाहिल्यास ४ लेख ज्ञानेश्वर पूर्वकालीन मराठी, एक ज्ञानेश्वरकालीन मराठी, एक ज्ञानेश्वरोत्तर कालीन मराठी, ३ जुन्या कानडीतील आणि ७ संस्कृत आहेत.

ज्ञानेश्वरपूर्वकालीन मराठी भाषेचे फारच थोडे नमुने आपणास माहीत आहेत. महानुभावाचे ५।२ ग्रंथ जरी ज्ञानेश्वर पूर्वकालीन आहेत तरी या खंडांत प्रसिद्ध केलेल्या सावरगाव ( श. १०८६ ), तेर (श १०८६), नेवासे (श. ११६१), या शिलालेखाच्या मानानें बरेच अलीकडचे आहेत. या खंडांतील व याच मालेच्या पहिल्या खंडांतील मराठी शिलालेख सोडून दिले तर इतरत्र प्रसिद्ध झालेले ज्ञानेश्वरपूर्वकालीन शिलालेख सारे सहा आहेत. या दोन खंडात ज्ञानेश्वरपूर्वकालीन मराठी भाषेतील ५ लेख आले आहेत. ही संख्या थोडी असली तरी मराठीचे अति प्राचीन नमुने म्हणून या लेखांना फार महत्त्व आहे हें सांगण्याची जरूर नाहीं.

नेवासे येथील मराठी शिलालेख श. ११६१ चा म्हणजे ज्ञानेश्वरांच्या अगोदर सुमारें ५० वर्षे कोरलेला आहे. या लेखात कर्णेश्वर देवाचा उल्लेख आहे. कर्णेश्वर हें करवीरेश्वर या रूपाशीं संबद्ध असें रूप आहे. ज्ञानेश्वरांनी करवीरेश्वराचे देवळांत बसून ज्ञानेश्वरी लिहिली असा प्रवाद आहे. तो खरा कीं खोटा हें सांगतां येत नाही. पण नेवासे येथें करवीरेश्वर किंवा कर्णेश्वर या देवाचें देऊळ होतें येवढें मात्र या लेखावरून निश्चयानें ठरतें.

या खंडांतील परभणी ताम्रपटाकडे बऱ्याच लोकांचें लक्ष वेधलेलें दिसतें. त्यांत आलेल्या चालुक्य कुलाच्या माहितीमुळें ज्याप्रमाणें कानडी विद्वानाचें त्याजकडे लक्ष गेलें त्याप्रमाणें त्यांत सोमदेव सूरी या जैन कवीविषयी माहिती आल्यानें जैन विद्वानांचें त्याजकडे लक्ष लागलें. दोघानाही वरील ताम्रपट आपआपल्या परीनें महत्त्वाचा वाटल्यामुळें त्यांनी तो अनुक्रमें प्रबुद्ध कर्नाटक व्हाल्यूम १५ अंक १ व एक जैन नियतकालिक यांत थोड्या फरकानें छापला., याशिवाय श्री गोविंद पै व श्री. पां. भि. देसाई यांनीं भारती १ लें वर्ष ८, ९ व १० अंक व जय कर्नाटकाच्या १९३३ सालच्या डिसेंबरचा अंक यात लेख लिहून परभणी ताम्रपटावरील विवेचनासंबंधीं अनुकूल व प्रतिकूल विचार प्रकट केले आहेत. त्यातल्या त्यात श्री. गोविंद पै याचा लेख विस्तृत व विशेष विचारप्रवर्तक आहे. पण या विषयासंबंधीची चर्चा अजून चालूं आहे. तेव्हा त्याविषयी अनुकूल प्रतिकूल विचार प्रकट करणें योग्य नसल्यानें तो प्रश्न तसाच सोडून देतों. एकंदरीत तो ताम्रपट महत्त्वाचा ठरला येवढे मात्र निश्चित.

तेर येथें कानडी लेख सांपडला हें विशेष आहे. आज तेरच्या आसपास कानडी बोलणाराचा मागमूसही नाही. पण सुमारें ८०० वर्षांपूर्वी तेथें मराठी भाषा जाणणाऱ्यांप्रमाणें कानडी भाषा जाणणारेही असावेत असें वाटतें. काही अंशी तीच गोष्ट पुळुंज येथील लेखांचीही आहे. सध्यां पुळुज येथें किंवा पुळुंजच्या आसपास कानडीचा पत्ताही नाही. पण सात साडेसातशे वर्षांपूर्वी तेथें कानडी जाणणारे कांही लोक होते येवढेंच नव्हे तर पुळुंज व तिच्या आसपासची ग्रामनामेंही कानडी होती असें तेथील लेखांवरून दिसतें.

तेर व लातूर येथील लेखही महत्वाचे ठरल्याशिवाय राहणार नाहींत असें वाटतें. या दोन्ही ठिकाणच्या लेखांच्या बाबतीत मी खात्रीनें सांगूं शकतों कीं, लेखाच्या प्रसिद्धीकरणानें युरोपियन संशोधकांनी त्या गांवाविषयी केलेल्या संशोधनांत मी महत्त्वाची भर टाकली आहे.

ज्येष्ठ शुद्ध १ ।१८५६ ग. ह. खरे.

# अनुक्रमणिका.

## शोधपत्रक

| पृ. | ओ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ३ | ४ | [ न ]गाळा | |
| ५ | ५ | दिधली | दीधली |
| १२ | १४ | कूपट्टोग्गारिका | कूपट्टोम्गारिका |
| १२ | १६ | पव्वे | पूर्व्व |
| १६ | ३३ | " १८ । " १६ | आहे १८ । आहे १६ |
| ४९ | १५ | पर | परं |
| ४९ | १५ | निळयन्त | निळयन्तं |
| ५२ | ३ | पाम्चर | पाम्बर |
| ६८ | ३ | साह्मणिदेवेय | साह्मणि, देवेय |
| ७२ | १३ | शुद्ध १५ | शुद्ध १२ |
| ८५ | शेवटची ओळ | इन साउथ | ऑफ सदर्न |

---

## संक्षेप

इंडि. अँटि. व्हॉ. इंडियन अँटिक्वेरी व्हॉल्यूम.

एपि. इंडि. व्हॉ.=एपिग्राफिया इंडिका व्हॉल्यूम.

एपि. कर्ना.=एपिग्राफिया कर्नाटिका.

जे. बी. बी. आर. ए. एस.=जर्नल ऑफ दि बॉंबे ब्रँच ऑफ दि रॉयल एशियाटिक सोसायटी.

द. म. इ. सा. खं.=दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाची साधने खंड.

भा. इ. सं. मं. त्रै. व. अं.=भारत इतिहास संशोधक मंडळ त्रैमासिक वर्ष अंक.

E p–Epi. Ind.=Epigraphia Indica

J. Journal

J. R. A. S.=Journal of the Royal Asiatic society

# दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाचीं साधनें
# खंड २ रा

## १ कदंब मारडदेव याचा सावरगांव शिलालेख श. १०८६

( श्री. ग. ह. खरे )

*उपलब्धि—प्रस्तुत शिलालेख मला सावरगांव ता. ( तुळजापूर जि. उस्मानाबाद ) येथें मिळाला. हा तेथील 'मल्लिकार्जुन' नांवाच्या एका जुनाट देवालयांत एका खांबाच्या दक्षिण बाजूवर लिहिलेला आढळला. याची लांबी व रुंदी अनुक्रमें १४ व १० इंच आणि ओळी ८ असून प्रत्येक ओळींत ११–१५ अक्षरें आहेत.

**अक्षरवटिका**—अक्षराचें सामान्य स्वरूप ११ व्या शतकांतील देवनागरी आहे. 'स' व 'श' यांतील फरक स्पष्ट आहे. 'ग्र' अगदीं हल्लीं सारखाच काढला आहे. पृष्ठमात्रा कोठेंहि वापरलेली नाहीं. अनुस्वार पोकळ काढला आहे.

**भाषा**—मराठी गद्य आहे हें सकु, सुध, देवीचेआ कीर्तनासि, वीसोवे, द्राम, माधवनायकें, फेडी तो, वगैरे रूपांवरून सहज दिसून येणार आहे.

**काल**– कालाचा उल्लेख 'सकु १०८६ तारण संवत्सरे आश्विन सुध १ गुरौ' असा आहे. जंत्रीप्रो गत श. १०८६ ला तारण संवत्सर येतो; पण आश्विन शु. १ ला शनिवार येतो. इंग्रजी तारीख इ. ११६४ सप्टेंबर १९ ही येते.

**विषय**– या लेखांत मुख्य विषय दानासंबंधीचा आहे. दान देणारा पहिला गृहस्थ मारडदेव हा आहे. याच्या पाठीभागें कडंबकुलतिलक व महामंडलेस्वर अशीं दोन उपपदें आहेत. आज आपणांस गोवें, हान-

---

* पा. स. १०।१८५२

गल व वनवासी या तीन ठिकाणचे कदंब माहीत आहेत. पण या तिन्ही कदंबाच्या वंशावळींत वरील नांव सांपडत नाहीं. महामंडलेस्वर पदावरून तो मांडलिक होता हें स्पष्ट आहे. पण कोणाचा हें येथें सांगितलें नाहीं. त्याचा नोकर **भाली** यानें अंबा देवीच्या कीर्तनासाठीं कांहीं विसोवे दिले. येथें कीर्तन या शब्दाचा अर्थ नेहमींचा म्हणजे गुणवर्णन हा नसून देऊळ हा घ्यावा असें मला वाटतें. ताम्रपटशिलालेखांतून कित्येक ठिकाणीं कीर्तन या शब्दाचा देऊळ असाच अर्थ करावा लागतो ( पहा—प्रसन्न कुमार आचार्य यांचा A dictionary of Hindu Architecture हा ग्रंथ; पृ. १३० ते १३२ ). विंशोपक या संस्कृत शब्दापासून ( वीशोवअ, वीसोवा आणि त्याचें अनेक वचन वीसोवे ) वीसोवा हा शब्द बनलेला दिसतो. किती वीसोवे दिले हें लेखांत सांगितलें नाहीं. माधवनायक व लाहिंपनायक या दोघांनीं मिळून दरमहा २ दाम दिले आहेत. या दोन पुरुषाविषयीं अधिक माहिती या लेखांत नाहीं. पण नायक हा शब्द हल्लींप्रमाणेंच लेखकालीं सावकारवाचक तर नसेलना ? विस्वे व दाम हीं दोन नाणीं आज आपणास अगदीं क्षुद्र वाटतात पण जों जों मागील काळांत जावें तों तों विलक्षण स्वस्ताई असलेली दिसून येत असल्यामुळें त्यावेळीं या देणग्याही कोरून ठेवण्याइतक्या महत्त्वाच्या असल्या पाहिजेत हें उघड आहे. ही देणगी मात्र देवीच्या नित्यनैमित्तिक खर्चासाठीं असावी असें वाटतें.कारण ती प्रतिमास द्यावयाची आहे. यापुढें जो या देणग्या फेडणार नाहीं, तो कुत्रा किंवा डुक्कर वगैरे पशू होईल असें सांगितल्याचें दिसतें. पण फेडी याचा न फेडी हा अर्थ कसा होऊं शकेल ? फेडी याऐवजीं न फेडी असे शब्द असते तर फारच बरें झालें असतें. शेवटच्या ओळींत ‘ बहुभिर्वसुधा भुक्ता राजभिः सगरादिभिः’ या श्लोकाची दुसरी ओळ घेतली आहे; पहिली गाळून टाकली आहे.

### वाचन.

( १ ) सकु १०८६ तारण संव

( २ ) त्सरे आश्विन सुध १ गुरौ कडं [ब]

( ३ ) कुलतिलक महामंडलेस्वर मा

( ४ ) रड (?)देवराणक तत्पादपद्मोपजी

( ५ ) वि भाली अंबादेवीचेआ कीर्तनासि वीसोवे म–
( ६ ) माधवनायके लाहिंपनायके मासप्रति द्रा
( ७ ) म २ दत्त[न] फेडी तो स्वान गावपशु– ल य
( ८ ) स्यं यस्य य [दा] [भू] मी तस्य तस्य तदा फ[लं]

## १० नेवासें येथील २ शिलालेख श. ११६१ व श.?

( श्री. ग. ह. खरे. )

*नेवासें येथील मुक्कामांत मला जे २ लेख मिळाले ते पुढें देत आहे.

१

**उपलब्धि**– हा लेख मोहिनीराजाचें देवळाचे जवळच उत्तरेस असलेल्या एका वाड्यांत ( हा वाडा काण्णव देशपांड्यांचा आहे ) एका वाटोळ्या दगडावर खोदलेला आढळला. दगड सुमारें १॥ फूट व्यासाचा असून त्याला दोन्ही तोंडावर वाटोळ्या २ इंच रुंदीच्या व १ इंच जाड अशा अंगच्याच पट्टया दाखविल्या आहेत. माथ्यावर दोन इंच रुंद वर्तुळामध्यें असलेल्या खोल भागांत लेख खोदला आहे. लेखाच्या ओळी ६ असून त्यांत अनुक्रमें १३, १८, १५, १९, २५, २५, अक्षरें आहेत. शेवटच्या ओळीशिवाय बाकी लेख शाबूद आहे.

**अक्षरवाटिका**– अक्षरांचें सामान्य स्वरूप १२ व्या शतकांतील यादवांच्या शिलालेखाप्रमाणें आहे. पृष्ठमात्रा कोठेंही उपयोगांत आणलेली नाहीं. 'श्री' वर वेलांटी खेरीज डाव्या अंगास मात्रा दिलेली आहे. कोठें एक व कोठें दोन अशा चरणरेघा काढलेल्या आहेत. 'ए' म्हणजे उलटा समभुजत्रिकोण आहे.

**भाषा**–या लेखाची भाषा संस्कृतप्रचुर मराठी असून अशुद्धता अगदीं नाहीं. मी आंबे येथील २ ऱ्या शिलालेखावरीलनिबंधांत सांगितलेले आहे.

१ ही ओळ अगदीं खराब झाली आहे. अक्षरांचे थोडे थोडे भाग दिसत आहेत त्यावरून लिहिली आहे. पण हाच मजकूर तेथें आहे.

* पा. स. १०।१८५२.

कीं, या वेळची मराठी भाषा कांहीं संस्कृत रूपें व कांहीं मराठी रूपें यांनीं बनलेली असते. हा लेख म्हणजे याचें आणखी प्रत्यंतर आहे. ईए, देऊ, देवें दीधली, हीं रूपें ध्यानांत ठेवण्यासारखीं आहेत.

**काल**— लेखाचा काल शके ११६१ विकारी सवत्सरे असा आहे. गत शक ११६१ ला विकारी संवत्सर आहे. या लेखांत राज्यकर्त्याचा उल्लेख नाहीं हें विशेष आहे.

**विषय**— ज्या खांबाला टेकून ज्ञानेश्वरांनीं ज्ञानेश्वरी लिहिली असें म्हणतात त्या खांबावरील लेख इंडि. ॲंटि. व्हॉ. ४ मध्यें छापला आहे. त्यांत आरंभीं 'ओंन्नमः [ कर ] वीरेश्वराय' असें वाक्य आहे. हा सर्व लेख संस्कृत भाषेंत असून यांत बहुधा याच देवाच्या अखंडनंदादीपासाठीं दरमहा ६ रुपयांची वृत्ती करून दिली आहे. मला लेखाचा ठसा घेण्यास सवड मिळाली नाहीं व इंडियन अँटिक्केरीमध्यें त्याची प्रतिमा दिलेली नाहीं. ओझरत्या दृष्टीनें पाहिला असतां असें वाटतें कीं, हा लेख मुसलमानी कालांतील असावा. त्या मानानें हा लेख जुना आहे. ज्याला मराठींत कण्हेर म्हणतात त्यालाच संस्कृतमध्यें करवीर असें म्हणतात. शिलालेखांत या दोन रूपांमधील ' कणैर ( ईश्वर ) असें रूप सांपडतें. करवीर हें कदाचित् **कण्हेरचें** संस्कृतीकरणही असणें शक्य आहे. ' कणैरेश्वर ' हें ज्या देवाबद्दल भूमी दान केली त्याचें नांव. नेवाशाचे लोक असें सांगतात कीं, हल्लीं ज्या ठिकाणीं ज्ञानेश्वरांचा खांब आहे तेथें पूर्वीं करवीरेश्वराचें देऊळ होतें. हें म्हणणें कांहींसें खरें असावें असें वाटतें. कारण देवळापाठीमागील इमारतीचे मधले दोन दर्शनी खांब हेमाडपंती पद्धतीचे खात्रीनें आहेत. या देवाचा जुना वृत्तीकार शुक्लयजुर्वेदाच्या माध्यंदिन शाखेचा व शौनक गोत्री असून त्याचें नांव श्रीसिलूपंडित होतें. पांपूवीहरि म्हणजे खलाल पिंपरी असावी. हें गांव नेवाशाच्या सीमेवर आहे. या गांवाच्या सीमेंतील १८ निवर्तनें जमीन देवाकडे पूर्वींपासून चालूं होती असें दिसतें. ६ व्या ओळीवरून असें म्हणतां येतें कीं तत्कालीन अधिकाऱ्यानें ही जमीन वृत्तिकाराच्या पोषणाकरितां पुन्हां नव्यानें सनद देऊन चालूं ठेविली.

**वाचन**

( १ ) स्वस्ति श्री शकू ११६१ विकारी सं

( २ ) वत्सरे ॥ श्री **कणैरेस्वरदेवाल्ये** ॥ पुराण

( ३ ) वृत्तिकारः । शौनकगोत्रीयः । माध्यंदिनः ॥
( ४ ) श्री सीलूपंडितः ॥ तथा पांपूवीहारिसीमागारे ॥
( ५ ) पुराण वृत्ती भूमी निवर्तने सर्वनमसें अठरा १८ [1]ईए भूमी
( ६ ) कणेरेश्वरदेॐमूली ॥ हे भूमि देवें पुरुषेण[2] ॥ जीवणा दिध[3]ली[4] ॥

## २

हा अगदीं छोटा म्हणजे दोन ओळींचा शिलालेख नेवासें बुद्रुक-मध्यें नारदमुनीच्या देवळाजवळ एका दगडावर कोरलेला आढळला. या लेखाच्या दोन ओळी असून त्यांत अनुक्रमें १५ व १६ अशीं अक्षरें आहेत. अक्षर अर्वाचीन म्हणजे तेराव्या चौदाव्या शतकांतील असून च, ण्य यांची रूपेंच कायती ध्यानांत ठेवण्यासारखीं आहेत. लेखाची भाषा मराठी पण अगदीं अशुद्ध आहे.

लेख असाः—

( १ ) स्विलादमाठ च उदकदाना च समस्त
( २ ) पुण्यषान देवाल्यं धाॐ आकुरिमाहदेति

याचा अर्थ असा दिसतो कीं, मठ बांधणें व पाणी पिण्याची व्यवस्था करणें हीं कामें पुण्याची खाण आहेत. आणि देवालय बांधणें हें तर त्याहूनही फार पुण्यकारक आहे.

---

# ११ यादव रामचंद्र याचा पूर शिलालेख श. १२०७

( श्री. ग. ह. खरे )

उपलब्धि—*प्रस्तुतचा शिलालेख मंडळाच्या प्रदर्शनांतील असून तो सासवड ( सासवड—पुणें ) जवळच्या पूर गांवाहून आणिला असल्याचें समजतें.

---

१ येथें दगड फुटला आहे. पण ' ई ' ची वेलांटी व खालचा भाग स्पष्ट दिसत आहे. २ ' ण ' चा उजवा भाग दिसत आहे. ३ अगदीं अस्पष्ट पण भाषेच्या दृष्टीनें ध किंवा न्ह पाहिजे. ४ ' ली ' चा उजवा काना व वेलांटी ही स्पष्ट आहेत; ' ल ' अस्पष्ट.

*पा. स. २४।१८५२

**वर्णन**—ज्या दगडावर लेख कोरला आहे, त्याची उंची २॥ फूट, जाडी ५ इंच व रुंदी वरून खालीं ९, १२ व ९ इंच अशी आहे. लेखाच्या वर डाव्या अंगास चंद्र व उजव्या अंगास सूर्य काढले आहेत. त्या खालीं ११ ओळी मजकूर असून मजकुराखालीं गद्धेगाळाचें चित्र आहे. पहिल्या ९ ओळी सलग आहेत. शेवटच्या २ ओळींचें, गद्धेगाळाच्या चित्रांतील गाढवाच्या कानांनीं, २ भाग झाले आहेत. दगड खडबडित असल्यामुळे अक्षरें उठून दिसत नाहींत. जों जों खालीं यावें तों तों अक्षरें बारीक बारीक होत आलीं आहेत. शेवटच्या ओळींतील अक्षरें एकदम मोठीं झालेलीं दिसतात.

**अक्षरवटिका**— लेखाचें स्वरूप १२ । १३ व्या शतकांतील यादवांच्या इतर देवनागरी लेखांप्रमाणेंच आहे. पहिल्या ४।५ ओळींतील अक्षरांचें वळण जितकें रेखीव आहे, तितकें बाकीच्या ओळींत दिसत नाहीं. षें ( ओ. २ ), दौ ( ओ. ३ ) व, प्रौ ( ओ. ४ ) या ठिकाणीं पृष्ठमात्रा आहे असें वाटतें. स्रीवर मात्रा आहे

**भाषा**—मराठी गद्य आहे.

**काल**—लेखाचा काल शक १२०७ पार्थिव संवत्सर आश्विनादौ असा आहे. गत शक १२०७ ला पार्थिवसंवत्सर आहे. वार दिलेला नसल्यानें मितीचा पडताळा घेतां येत नाहीं. कदाचित् आश्विनादौ याचा अर्थ आश्विन शुद्ध १ असेल.

**विषय**—लेख घाण झाला असल्यानें चांगलासा लागत नाहीं. पण जो लागतो त्यांत श्रीमत्प्रौढप्रतापचक्रवर्ति रामचंद्र देव, दफ्तरखान्यावरील मुख्य हेमाडिपंडित, सेनापति किंवा न्यायाधीश बोईदेव ( ? ) स्रीपत पभुण ( ? ) नायक, व रामचंद्रदेव यांचे उल्लेख दिसतात. बहुधा रामचंद्र देवाला कांहीं तरी इनाम करून दिल्याबद्दलचें हें दानपत्र असावें.

**वाचन**.[1]

( १ ) स्वस्ति स्री सकू १२०७

( २ ) वर्षें प ( पा ) र्थिव सवछरे

---

१ शिलालेखाचा ठसा घेतां येत नाही. तेव्हां प्रत्यक्ष पाहून जसा लागला तसें वाचन दिलें आहे.

( ३ ) आश्विन ( ना ) दौ अद्येह स्त्री
( ४ ) मप्रौ ( त्प्रौ ) ढप्रतापचक्रव
( ५ ) र्ती स्त्रीरामच( चं )द्रदेवविजय
( ६ ) राज्योदै तद्पादपदुमोपजिवि स
( ७ ) कळकर्णा ( रणा ) धिप .... हेमाडि पांडि
( ८ ) तो । त बोंइ – – दंडनायक । स्त्रीपत प(प्र)धु
( मु ? )
( ९ ) णें नायक । रामचंद्रदेवों नाडिती जीवि......
( १० ) ळक कुळ........
( ११ ) .......... सोडि... .......

---

# १२ वेळापूर येथील आणखी दोन शिलालेख श. ? व श. १२२२

( श्री. ग. ह. खरे )

†नुकत्याच छापलेल्या 'दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाचीं साधनें खंड' १ ला. या पुस्तकांत मीं वेळापूर येथील दोन शिलालेख यथाशक्ति लावून प्रसिद्ध केले आहेत. मला त्याच गांवीं आणखी दोन शिलालेख मिळाले ते पुढें देतों. हे लेख आर्किआलॉजीच्या खात्यास सांपडल्याचें दिसत नाहीं.

१

हा शिलालेख गांवाच्या मध्यभागीं अर्धवट गाडलेला असा आढळला. त्यामुळें यास उकरून काढावें लागलें. याची उंची ४। फूट आणि रुंदी वर, मध्यें व खालीं अनुक्रमें १॥। फूट १॥फूट व १। फूट अशी आहे. आरंभीं सांब, त्या-खालीं डाव्या अंगास सूर्य व उजव्या अंगास चंद्र काढला असून खालीं २ ओळी मजकूर लिहून झाल्यावर त्या खालीं कमलावर उभी असलेली २।

---

† पा. स. १२।१८५२.

फूट उंचीची दिगंबर मूर्ति खोदलेली आहे. हिच्या एका अंगास तलवार व दुसऱ्या अंगास सवत्स धेनू आहे. या मूर्तीच्या डोक्याच्या दोन्ही अंगास लेखाच्या ४ओळी आहेत.हा लेख जैनांचा म्हणावा तर वर सांब आहे व वैदिक धर्मीयांचा म्हणावा तर दिगंबर मूर्ति आहे. असो. लेखाच्या एकंदर ६ ओळी आहेत; पण त्या पैकीं फक्त पहिल्या ओळींतील ‘ स्वस्ति श्री ’ व ५ व्या आणि ६ व्या ओळींतील ‘ मंगल महस्री ’ येवढीं अक्षरें लागलीं आहेत. बाकीचा भाग लागत नाहीं.

या शिवाय मानेयांच्या वाड्याच्या दर्शनी भागाजवळच एक चंद्र-सूर्यांकित दगड आहे. त्यावर अक्षरांच्या कांहीं खुणा दिसतात पण लेख अगदीं अस्पष्ट असल्यानें ठसा घेण्याच्या भरीस पडलों नाहीं.

२

**उपलब्धि** हा लेख गांवाच्या दक्षिणेस पूर्व पश्चिम वाटेवर असलेल्या एका खडबडीत दगडावर कोरलेला आहे. याची उंची ४ फूट व रुंदी १ फूट आहे. यावर आरंभीं सांब, त्याखालीं डाव्या बाजूस सूर्य व उजव्या बाजूस चंद्र अशा आकृति आहेत. लेखाच्या ओळी १४ असून प्रत्येक ओळींत १० ते १५ अक्षरें आहेत.

**अक्षरवटिकाः**– अक्षरांचें स्वरूप प्रसिद्ध केलेल्या लेखांप्रमाणें असून पृष्ठ मात्रा कोठेंही नाहीं.

**भाषा**–भाषाही पूर्वीच्या दोन लेखांप्रमाणेंच तत्कालीन मराठी आहे.

**काल**–लेखाचा काल श.१२२२ शार्वरी संवत्सर असा आहे.गत शक १२२२ ला शार्वरी संवत्सर येतो. पुढें ज्येष्ठ असा कांहीं तरी शब्द आहे पण तो शब्द मला अजून नीट लागला नाहीं.

**विषय**–या लेखांत प्रौढप्रताप चक्रवर्ति रामचंद्रदेव [यादव] त्याचा [माणदेशसंबद्ध] सर्वाधिकारी श्री जोइदेव, त्याच्या हाताखालील ब्रह्मदेव-राणा व त्याचा भाऊ बाइदेव यांचे उल्लेख असून शिवाय बाइदेवानें वटेश्वर देवाला मठ करून ओवरी दिल्याचें सांगितलें आहे. या लेखाचा लेखक दामोदर पंडिताचा मुलगा माइदेव हा आहे. कदाचित् मी प्रसिद्ध केलेल्या लेखांपैकीं १ ल्या लेखाचा लेखकही हाच असूं शकेल; कारण दोन्ही लेख एकाच गावांत व एकाच वर्षांत खोदले असून एकाच देवाविषयींचे आहेत.

**वाचन.**

( १ ) स्वस्ति श्री शकु १२२२ सर्वरी सं {व}
( २ ) स(त्स)रे ज्येष्ठादौ श्रीमत्प्रोढ
( ३ ) प्रतापचक्रवर्ति श्रीराम
( ४ ) चंद्रदेवविजयराज्योदयि त
( ५ ) दुपादपद्मोपजीवी सर्वाधि
( ६ ) कारी श्रीजोइदेव तं(त)नि(त्रि)रोपि
( ७ ) त ब्रह्मदेऊराणे तद्भ्रातर बाइ
( ८ ) देऊराण माणदेशासंबंध वे
( ९ ) लापुर तेथल ध [ र्मे ] स्थल वटेस्व
(१०) राचें गुण मठअ केले वा† वोव
(११) र बाइदेवें दत पाली तो स्वर्गा
(१२) जाए न प(पा)ली तो नरका जाए लेष
(१३) क दामोदरपंडितसुत माइदेव मंगलं
(१४) महश्री

---

# १३ कदंब २ रा जयकेशिन् (गोवे) याचा असोगे ताम्रपट श. १०५५

( श्री. ग. ह. खरे )

'दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाचीं साधनें खंड १ ला' यांत 'असोगे' येथील ताम्रपट प्रसिद्ध केला आहे ( पृ. २६ ते ३२. ). त्यावेळीं प्रत्यक्ष ताम्रपट माझ्या हातीं आला नव्हता. आतां तो मिळाल्यामुळें ताम्रपटावरून केलेलें वाचन, लेखनासंबंधीची इतर माहिती व ताम्रपटवर्णन हीं देत आहे. हा ताम्रपट दिल्याबद्दल त्याचे मालक श्री. गणपतराव इनामदार ( असोगे ) यांचे आभार मानिले पाहिजेत.

---

† या अक्षराविषयीं शंका आहे.

**वर्णन**– ताम्रपटाचे ३ पत्रे असून प्रत्येकाची लांबी व रुंदी ८$\frac{८}{१०}$″ व ६$\frac{१}{१०}$″ आहे. पहिल्या व शेवटच्या पत्र्यांच्या बाहेरच्या बाजू नेहमीप्रमाणें कोऱ्या आहेत. ताम्रपटाची कडी मजकडे आलेली नाहीं. चार बाजूंवर अनुक्रमें १२, १३, १२, १२ अशा ओळी असून प्रत्येक ओळींत २० ते २५ अक्षरें आहेत.

**अक्षरवटिका**– अक्षरांचें स्वरूप १०।११ व्या शतकांतील देवनागरी आहे. पृष्ठमात्रेचा सर्वत्र उपयोग केला आहे. अनुस्वार व विसर्ग बहुधा पोकळ काढले आहेत. **धा** काढतांना त्या वेळच्या पद्धतीप्रमाणें **ध**ची उभी रेघ व **धा**चा काना यांच्यामध्यें आडवी, दोन्ही उभ्या रेघांना जोडणारी रेघ काढली आहे. **ए** व **ई** यांचीं वळणें यादवांच्या उत्तरकालीन लेखांत सांपडतात त्याचप्रमाणें जवळजवळ आहेत.

**लेखनपद्धति**– **ब** बद्दल **व** वापरला आहे. उदाहरणार्थ– विभर्ति ( ओ. ३ ), कादंव ( ओ. १० ), वुधो ( ओ. ४७ ) वगैरे. **श** बद्दल कांहीं ठिकाणीं **स** लिहिला आहे. उदाहरणार्थ– सौर्य ( ओ. २१ ), गल्गेस्वर ( ओ. २८ ), साके ( ओ. ३८ ). विसर्गापुढें **श** किंवा **स** आला असतां बहुधा विसर्गाचा परसवर्ण केला आहे. उदाहरणार्थ– वश्शिवश्शिवं ( ओ. २ ), दक्षिणस्सुमनसां ( ओ. १८ ), र्थज्ञश्शासनं ( ओ. ४९ ).

## वाचन.

### पत्रा पहिला बाजू दुसरी

( १ ) श्री भूयाद्विभूत्यै भवतां स वराहवपुर्हरिः [।*] पोत्रप्रांतस्छि (स्थि) ता य ।–

( २ ) स्य मुस्ता स्तंवायते मही ॥[१॥*]स वश्शिवाश्शिवं दद्यान्मौलौ यस्य

( ३ ) हिमद्युतिः[।*] विभर्ति नाकनलिनीमृणालशकलश्रियं ।[।२॥*]पुरा पु

( ४ ) राणां विजये शभोः कतिचिदास्पदं । चक्कुर्ल्ललाटफलके श्रमस्त्रे

( ५ ) दोदविंदवं(वः)।[।३॥*] कदंवतलमासेभ्यस्तेभ्यो नेत्रत्रयार्चितः [।*] चतुर्भु

( ६ ) जस्समभवच्छौ(च्छौ)र्यधैर्यधरो नरः [।।४॥*]शक्तिमान्विवुधानंदक

( ७ )र(रः)स्कंद इवापरः[।*]त्रिलोचनकदंबाख्यां बिभ्रदद्भुतविक्रमः[॥५॥*]

( ८ ) स नागवल्लीकाल्लिते कदलीषंडमंडिते । चकार कोंकणे वा

( ९ ) सं विलासवसातिस्चि(श्चि)रं । [।६॥*] ततः प्रववृते वंशश्शुद्ध श्शीतांशुनि

(१०)र्म्मलः । अम्लानकमलोल्लासो महेस्व(श्व)रकृतास्छि(स्थि)तिः[।।७।।*] कादंबप

(११) दविख्यातो राजहंसोपशोभितः । अभंग इव गंगायाः प्रवा

(१२) हो हिमवद्गि(?)रेः ।[।८।।*]एतस्मिं(स्मि)ंन(ञ्ज)यकेशिभूपतिरभूदं भोधिगर्भो

पत्रा दुसरा बाजू पहिली

(१३) द्भवै रत्नैरर्थिहितैश्चकार सफलं यस्त्यागसिंहासनं। [।*]निश्श(श्शं)

(१४) कोंकतटे गृहीतसमरौ चालुक्यचोलाधिपौ कृत्वा रायपि

(१५) तामहेति महतीमद्धा प्रसिद्धिं गतः । [।९॥*] तस्माद्विजयादि त्यस्सत्यवता

(१६) मग्रणीर्गुणैः प्रगुणः [।*]जातस्स यस्य कीर्त्तिर्व्विलसति लोके पताकेव ॥ [१०॥*]

(१७) जातोस्माज्जयकेशिदेवनृपतिस्सी(स्सा)क्षादिवाधोक्षजः[।*]क्षोणीर । +

(१८) क्षणदक्षिणस्सुमनसामानंदसंदोहदः।[।*]यो बाल्यो(ल्ये)पि यशोदयाप।-

(१९) रिगतस्सत्योल्लसन्मानसो दृष्टोदारपराक्रमो बलिजये

(२०) लक्ष्म्या समालिंगितः [॥११॥*] अस्योत्सा(त्सा)हसखस्य साहसवतो निस्सं(श्शं)क

(२१) सौ(शौ)र्यस्छि(स्थि)तेः(ते)र्माहात्म्यं महनीयमानमहसः किं वर्ण्णयामो वयम् ।[।*]

(२२) यस्मै विस्मयवान्वितीर्य विधिना सर्व्वस्वभूतां सुतां सार्धं वाजिगजत्र

(२३) जेन पृथिवीनाथः कृतार्थोभवत् ॥ [१२॥*] कृतभोगपुरावासो वि।–

(२४) लासवसतिर्नृपः । स पुष्णन्नर्थिसार्थस्य विविधार्थैर्म्मनोरथान् ।[।१३।।*]
(२५) सरित्सह्याद्रिसंभूता शैवैर्लिंगौर्न्निरंतरा [।*] मलप्रहारिणीत्यस्ति ता

पत्रा दुसरा बाजू दुसरी

(२६) पपापापहारिणी।[।१४।।*]क्षत्रक्षेत्रक्षयोद्भूतस्फूर्ज्जद्वृजिनमार्जनात्। प्रा
(२७) प्ता परशुरामस्य स्वस्य नाम्नो यथार्थतान्(म्)। [।१५।।*] तस्यास्तीरेस्ति भगवान्
(२८) स्वयंभूर्भुक्तिमुक्तिदः । शंभुः प्रसिद्धस्छो(स्थौ)ल्येन गलगेस्व(श्व)रसंज्ञया ।[।१६।।*]
(२९) दत्तभक्तजनानन्दः पलसीदेशभूषणं(णः)। प्रकटीकृतमाहात्म्यस्तत्त
(३०) द्वरसमर्प्पणात् । [।१७।।*] तस्मै पूजोपचारार्थं जीर्ण्णोद्धरणकर्म्मणे । त
(३१) था चैत्रपवित्रादिपर्व्वणे सत्रसिद्धये । [।१८।।*] तत्तद्भोगविभूत्यर्थं
(३२) भक्तिनिर्भ्भरमानसः । महामाहेस्व(श्व)रः प्रादाज्जयकेशिमही
(३३) पतिः । [।१९।।*] कंपणे कालगिर्याख्ये कुपट्टोग्गरिकाभिधं ।। ग्रामं त्रिभोग
(३४) संपन्नं सर्व्वबाधाविवर्जितं।[।२०।।*]नमस्यं सर्व्वलोकस्य यावदाचंद्रता
(३५) रकं । प्रसिद्धचतुराघाटं (ट)पर्व्वसीमासमन्वितं । [।२१।।*] तपोनिष्ठागरिष्ठस्य
(३६) शिवशक्तेस्तपोनिधेः। वारिधारां समुस (त्सृ) ज्य पाणौ तत्पिंडिकात
(३७) टे । [।२२।।*] सर्व्वप्रधानसंमत्या पुरोहितपुरस्सरो[।*]विद्यावदातवदने

पत्रा तिसरा बाजू पहिली

(३८) विद्वद्वर्गेन्तिकास्छि(स्थि) ते ।। [२३।।*] सा(शा)के शरशराशांके प्रमादिपरिवत्सरे ।
(३९) फाल्गुने शुद्धपक्षस्य प्रतिपद्दिवसे शुभे। [।२४।।*] सूर्योपरागे सौर्येह्नि
(४०) सर्व्वपर्व्वोत्तमोत्तमे । अत्रैव चित्रचारित्रः प्राह श्रीकोंकणेश्वरः [।।*]

# कदंब २ रा जयकेशिन् ( गोवे ) याचा असोगे ताम्रपट श. १०५५



1/2 B. I. S. M. Collection of Copperplates No. 17 scale 1/4 th



2/1 B. I. S. M. Collection of Copperplates No. 17

(४१) आगामिभूपानभ्यर्थ्य धर्म्मोयं पालयतामिति ॥ [२५॥*] सामान्योयं
(४२) धर्म्मसेतुर्नृपाणां काले काले पालनीयो भवद्भिः । सर्व्वानेता
(४३) न्भाविनः पार्थिवेंद्रान्भूयो भूयो याचते रामचंद्रः॥[२६॥*] स्व ।–
(४४) दत्तां परदत्तां वा यो हरेत वसुंधराम् । षष्टिं वर्षसहस्रा ।–
(४५) णि विष्ठायां जायते क्रिमिः।[।२७॥*] श्रीशारदापदसरोरुहलोल ।–
(४६) भृंगः ख्यातिं गतो जगति जङ्गमभारतीति । श्रीसोमदेववि
(४७) बुधो व्यदधादिदं श्रीत्रैलोक्यदेवतनुभूरुपमन्युगोत्रः ।[।२८॥*]
(४८) अनल्पशिल्पकुशलो रामदेवाभिधः शुचिः । अलिखन्निखि
(४९) लार्थज्ञश्शासनं नृपशासनात् ॥ [२९॥*] मंगल महाश्री ॥ ※ ॥

---

# १४ राष्ट्रकूट गोविंद ३ रा याचा बहुलावाड ताम्रपट श. ७३२

(श्री. ग. ह. खरे.)

**उपलब्धि**– हा ताम्रपट श्री. सर. आबासाो मुजुमदार यांनीं खान-देशांतून आणला. यावर पूर्वी म्हणजे श. १८४४ सालच्या दहाव्या संमे-लनांत श्री. चांदोरकर यांनीं निबंध वाचला होता. त्या वेळीं त्यांनीं स्थल-निश्चयही केला होता. श्री. य. रा. गुप्ते यांनीं ‘ जर्नल ऑफ इंडियन हिस्टरी ’ या नियतकालिकाच्या ११ व्या अंकांत एका ताम्रपटाविषयीं एक टिपण प्रसिद्ध केलें आहे. त्या टिपणाच्या पादटीपेंत श्री. गुप्ते यांनीं, तो ताम्रपट श्री. आबा चांदोरकर यांनीं वाचून त्यावर निबंध लिहिल्याची माहिती आपणास मिळाल्याचें सांगितलें आहे. श्री. गुप्ते यांनीं टिपणांत दिलेली माहिती व प्रस्तुत ताम्रपट यांची तुलना करतां असें दिसतें कीं, ज्यावर श्री. गुप्ते यांनीं टिपण लिहिलें तो ताम्रपट हा नव्हे. असो.

**वर्णन**— प्रस्तुतच्या ताम्रपटाचे ३ पत्रे असून ते एका जाड कडींत ओवलेले आहेत. पत्र्यांची लांबीरुंदी १०″ × ५॥″ असून

कडीची लांबी ४॥″ आहे. कडीच्या जोडावर बैठ्या गरुडाची मूर्ति खोदलेली आहे. कडीचा व्यास ३″ व मुद्रेचा व्यास२″ आहे. नेहमीप्रमाणें पहिल्या व शेवटच्या पत्र्यांच्या बाहेरच्या बाजू कोऱ्या असून आंतील बाजू व दुसऱ्या पत्र्याच्या दोन्ही बाजू लिहिलेल्या आहेत. चार बाजूंवर अनुक्रमें १६, १५, १९, ५, अशा ओळी असून प्रत्येक ओळींत ३० ते ४० अक्षरें आहेत. दुसऱ्या बाजूच्या वरच्या दोन्ही अंगांचा व तिसऱ्या बाजूच्या वरच्या दोन्ही अंगांचा भाग खराब झालेला आहे. यामुळें तेवढ्या भागांतील लेखन अस्पष्ट आहे.

**अक्षरवटिका**–अक्षरांचें स्वरूप स्पष्ट देवनागरी पद्धतीवर गेलेलें आहे. अक्षराच्या माथ्यावर रेघ आलेली आहे. काना हल्लीच्या स्वरूपांत दृष्टीस पडतो. मात्रा हल्लीच्या स्वरूपांतही आढळते व ब्राह्मी पद्धतीवर लिहिलेलीही आढळते. पण केवळ अक्षराच्या माथ्याच्या डाव्या अंगास आडवी रेघ न काढतां त्या आडव्या रेघेच्या टोकास उभ्या रेघेचा एक लहानसा तुकडा जोडलेला आहे. अशा प्रकाच्या मात्रेचें परिणत स्वरूप म्हणजेच पृष्ठमात्रा असावी असें वाटतें. अनुस्वार व विसर्ग दोन्ही बहुधा पोकळ काढले आहेत. ग, श, ख यामध्यें असलेला फरक नीट ध्यानांत ठेवला तरच तिन्ही अक्षरांत चटकन फरक करतां येईल. स व भ यामधील फरकही सूक्ष्म आहे.

**लेखनपद्धति**— **ब** बद्दल सर्वत्र व वापरला आहे. कांहीं ठिकाणीं **न्** बद्दल अनुस्वार लिहिला आहे. उदाहरणार्थ– संवध्यमानकां ( कान् ) (ओ. ३०), महत्तरादीं ( दीन् ) (ओ. ३१), समेतोपि सं ( सन् ) (ओ. ८). **रि** बद्दल **ऋ** कांहीं ठिकाणीं वापरला आहे. उदाहरणार्थ– कृतयुगश्रृ (श्रि)य ( ओ. १४ ), कृ( क्रि )योत्सपर्ण(ओ. ४१), द्वातृं (त्रिं) शद ( ओ. ४० ).

**भाषा**– गद्यपद्यमिश्रित संस्कृत आहे.

**कालनिश्चय**— यांत दान दिल्याचा काळ श. ७३२ सर्वधारिन् संवत्सर आषाढ बहुल अमावास्या सूर्यग्रहण असा सांगितला आहे. येथें ७३२ हा शकाच्या चालू सालाचा आकडा आहे हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. संवत्सराचें नांव नुसतें गत नसून गतगत आहे असें वाटतें. चालू शक ७३२ म्हणजे गत शक ७३१ या वर्षी आषाढ वद्य अमावास्येस सूर्यग्रहण येत असून, त्या दिवशीची इंग्रजी तारीख इ. ८०९ जुलै १६ ही आहे ( पिल्ले–

इंडियन एफिमेरीज व्हॉ. १, भाग १, पृ. २३० ). वणी ताम्रपटाच्या काल-लेखनांतही हीच पद्धत दिसून येते. तेथें, शक ७३० सांगितला असून संवत्सर मात्र गत शक ७२८ शीं जुळणारा असा **व्यय** सांगितला आहे.

**स्थलनिश्चय**— या ताम्रपटांत पुढील गांवें आलीं आहेत. ( १ ) **श्रीमयूरखण्डी**— नाशिक जिल्ह्यांतील कळवण तालुक्याच्या दक्षिणेस असलेल्या डोंगराच्या ओळींतील मारकिंड नांवाचा डोंगरी किल्ला म्हणजेच **मयूरखण्डी** हें प्रसिद्ध आहे. ( २ ) **निंम्बस्थलि**—येथील ब्राह्मणाला दान केलें आहे. याचें हल्लींचें रूप नीमथळी-डी असें असावें. ( ३ ) **व(ब)हुला**— ज्या विषयांतील गांव दान केलें त्या विषयाचें नांव. हा भाग हल्लीं पूर्वखानदेश जिल्ह्यांतील पाचोरें तालुक्यांत मोडतो. ( ४ ) **व(ब)हुलावार**— दान केलेल्या गांवाचें नांव. हें गांव मजपाशीं असलेल्या नकाशांत दाखविलेलें नाहीं. ( ५ ) **व(ब)हुला नदी**— ही पाचोरें तालुक्यांत पाचोऱ्याच्या आग्नेयीकडून वायव्येकडे वहात येत आहे. ( ६ ) **वरग्राम**— हल्लीं याचें रूप वडगांव असें असावें; पण लेखांत उल्लेखिलेल्या ठिकाणीं हें गांव सांपडत नाहीं. ( ७ ) **राजउरा**— पाचोऱ्याच्या आग्नेयीस ८ मैलांवर राजुरी बुद्रुक व राजुरी खुर्द अशीं दोन गांवें आहेत. त्यांपैकीं कोणतें तरी एक येथें विवक्षित असेल. (८) **वारीखेर**—पाचोऱ्याची आग्नेयी व पूर्व या दिशांमध्यें पाचोऱ्याहून ७ मैलांवर वारखेडी बुद्रुक व वारखेडी खुर्द अशी दोन गांवें आहेत. दोहोंमध्यें बहुला नदी आहे. तिच्या दक्षिण तीरावरील वारखेडी खुर्द हें गांव येथें विवक्षित असावें.

**इतर माहिती**— ज्या ब्राह्मणास दान केलें आहे त्याचें नांव **महिधरभट्ट** व त्याच्या बापाचें नांव **श्रीधर**भट्ट असें दिलें आहे. त्याचें गोत्र **आयवच्छ ( त्स )** असून तो वच्छ( त्स )सगोत्री म्हणून सांगितला आहे. वत्स हें सामान्य गोत्र व आयवत्स हें उपगोत्र असावें असें वाटतें. ताम्रपट लिहिणारा, वणी व नेसरी ताम्रपटांचा लेखक जो **श्रीवत्सराजसूनु अरुणादित्य**, तोच आहे. दूतकाचें नांव मात्र **श्रीवादैय्य** असें आहे.

**तुलना**— या पुढें नेसरी ( श. ७२७ ), राधनपूर (श.७३० )*

* राधनपूर ताम्रपटांत नेसरी ताम्रपटांपैकी २१ ते २५ श्लोकांशिवाय बाकी सर्व श्लोक आले आहेत. म्हणून त्याचा स्वतंत्र उल्लेख पुढील कोष्टकांत केला नाहीं.

वणी ( श. ७३० ) व बहुलावाड ( श. ७३२ ) या तीन ताम्रपटांची तुलना करून त्यांत कोणते श्लोक कमी झालेले आहेत हें दाखवितों. वणी ताम्रपटांत काल श. ७३० व्यय संवत्सर असा सांगितला असला तरी त्यांत दिलेला कालाचा पुढील तपशील चालू श. ७३७ किंवा गत श. ७३६ या वर्षाशीं जुळत आहे हें लक्षांत ठेविलें पाहिजे.

| श्लो. क्र. | नेसरी | वणी | क्र. | बहुलावाड | क्र. |
|---|---|---|---|---|---|
| १ | स वोऽव्याद्वेधसा | आहे | १ | आहे | १ |
| २ | भूयोभवद्बृह | ,, | २ | ,, | २ |
| ३ | पक्षच्छेदभया | ,, | ३ | ,, | ३ |
| ४ | तस्याभूत्तनय | ,, | ४ | ,, | ४ |
| ५ | ज्येष्ठोलंघनजातया | ,, | ५ | ,, | ५ |
| ६ | अन्यैर्न जातु | ,, | ६ | ,, | ६ |
| ७ | एकत्रात्मबलेन | नाहीं | | नाहीं | |
| ८ | हेलास्वीकृत | आहे | ७ | आहे | ७ |
| ९ | लब्धप्रतिष्ठ | ,, | ८ | ,, | ८ |
| १० | प्राभूद्धैर्यवतः | ,, | ९ | ,, | ९ |
| ११ | यस्मिन्सर्व | ,, | १० | ,, | १० |
| १२ | यस्याकारम | आहे २ पाद* | ११ | नाहीं | |
| १३ | तास्मिन्स्वर्ग | ,, ३ पाद† | १२ | आहे | ११ |
| १४ | येनात्यंतदयालु | आहे | १३ | नाहीं | |
| १५ | संधायाशु | नाहीं | | आहे | १२ |
| १६ | यत्पादानतिमात्र | आहे | १४ | नाहीं | |
| १७ | विन्ध्याद्रेःकटके | ,, | १५ | आहे | १३ |
| १८ | नीत्वा श्रीभवने | ,, | १६ | ,, | १४ |
| १९ | लेखाहारमुखो | नाहीं | | नाहीं | |
| २० | संत्रासात्परचक्र | आहे | १७ | आहे | १५ |
| २१ | पांड्यदेशाधिपा | नाहीं | | नाहीं | |
| २२ | अंध्रचालुक्य | ,, | | ,, | |
| २३ | कोसलावंति | ,, | | ,, | |
| २४ | इत्थमेतान्यथा | ,, | | ,, | |
| २५ | यश्चंचच्चतुरंबु | ,, | | ,, | |
| २६ | तेनेदमनिल | ,, | १८ | ,, | १६ |

* यांत १२ व्या श्लोकाचे फक्त शेवटचे दोन पाद आहेत. † यात १३ व्या श्लोकाचे फक्त पहिले ३ पाद आहेत.

प्रस्तुतच्या ताम्रपटांत नेसरी ताम्रपटांतील क्रमांक ७,१२,१४,१६,१९, आणि २१ ते २५ हे श्लोक नाहींत. यांपैकीं नेसरी ताम्रपटांतील २१ते२५ हे श्लोक नेसरी ताम्रपटांशिवाय इतर ताम्रपटांत आलेले नाहींत. क्र. ७चा श्लोक इतर ताम्रपटांत आला असला किंवा नसला तरी तो गोविंदाच्या बापाविषयीं असल्यामुळें तो सोडून देऊं. बाकीच्या ४ श्लोकांत पुढील विषय आले आहेत. ( १२) गोविंदाचा बाप गोविंदास कंठिका देतो, पण तो परत करतो. ( १४ ) गोविंदाच्या बापानें गंगाला कैदेंत टाकलें असतां त्यास गोविंद सोडतो; पण गंग प्रतिकूल वर्तन करूं लागल्यामुळें त्यास पुन्हा कैद करतो. ( १६ ) मालव नायक स्वबलाचा विचार करून गोविंदापुढें नम्र होतो. ( १९ ) वेंगीश्वर शहराचा बाहेरचा तट बांधून देतो. या चार गोष्टी या ताम्रपटांत सहेतुक गाळल्या गेल्या आहेत किंवा यदृच्छया गळल्या आहेत याचा विचार केला पाहिजे.

## वाचन*

वृत्तें:— १, १७, १८, २० अनुष्टुभ्, २, ६, ८ वसंततिलका; ३ ४, ५, ७, ९, १५ शार्दूलविक्रीडित; १६ आर्या; १९, २१ इंद्रवज्रा; २२ पुष्पिताग्रा.

### पत्रा १ बाजू २

( १ ) स वो व्याद्वेधसा धाम यन्नाभिकमल(लं) कृत(तं) हरश्च यस्य कान्तेन्दु{कलया कमलं कृतं} [ ॥ १ ॥* ] [ भू ]

( २ ) [यो]भवद्वृहदुरस्थलराजमानश्रीकौस्तुभायतकरैरुपगूढकण्ठः {सत्या}-न्विता(तो) [ विपु ]

( ३ ) [ ल ]चक्रविनिर्जितारि(रिः) चक्रो(क्रे)प्यकृष्णचरितो भुवि कृष्णराजः [ ॥२॥* ] पक्षच्छे{दभया}श्रृ(श्रि){ताखिल}म{हा}

( ४ ) भूभृत्कुलभ्राजितात् दुर्लंघ्यादपरैरनेकविमलभ्राजिष्णुरत्नान्वितात् य{श्चालुक्यकुलादनूनवि}

*हें वाचन मूळ ताम्रपटावरून केलें आहे. ताम्रपट खराब झाल्यानें जीं अक्षरें दिसत नाहीत ती चौकटी कंसांत व जी अर्धवट दिसतात ती महिरपी कंसांत घातलीं आहेत. हीं दोन्हीं प्रकारचीं अक्षरें वाचतांना इतर ताम्रपटांचा उपयोग केला आहे.

( ५ ) [ बु ]धव्राताश्रयो वारिधेर्लक्ष्मी(क्ष्मीं)न्म(म)न्दरवत्सलीलमाचि-
राद‍ाकृष्टवां (वान्) वल्लभः [॥३॥*]तस्याभूत्त{न}यः [प्रतापवि]

( ६ ) सरैराक्रान्तदिङ्मण्डलः चण्डांशोः सदृशोप्यचण्डकरा(र)[ता*]
प्रल्हादितक्ष्मातलः धोरो {धैर्यधनो विपक्षव{

( ७ ) निताववक्त्राम्बुजश्रीहरो हारीकृत्य यशो यदीयमनिशं दिङ्नायिकाभि-
र्धृतं [ ॥४॥* ] ज्येष्ठोल्लंघन [ जातयाप्यम ]

( ८ ) लया लक्ष्म्या समेतोपि सं(स)यो(न्यो)भून्निर्म्मलमण्डलस्थितियुतो
दोषाकरो न क्वचित् कर्ण्णाधस्थित{दा{

( ९ ) नसंततिभृतो यस्यान्यदानाधिकं दानं वीक्ष्य सुलाजि(ज्जि)ता इव
दिशां प्रान्ते स्थिता दिग्गजाः [ ॥५॥* ]

(१०) अन्यैर्न्न जातु विजितं गुरुशक्तिसारमाक्रान्तभूतलमनन्यसमानमानं
येनेह बद्धम

(११) वलोक्य चिराय गंगं दूरं स्वनिग्रहं(ह)भियेव [क*]लिः प्रयातः
[ ॥६॥* ] हेलास्वीकृतगौडराज्यकमलामत्तं प्रवेश्या

(१२) चिरात् दुर्मार्गं मरुमध्यमप्रतिबलैर्यो वत्छ(त्स)राजं बलैः गौडीयं
शरदिन्दुपादधवलं च्छत्रद्व

(१३) यं केवलं तस्मान्नाहृततद्यशोपि ककुभां प्रान्ते स्छि(स्थि)तं तत्क्षणात्
[॥७॥*] लब्धप्रतिष्ठमचिराय कलिं

(१४) सुदूरमुत्सार्य शुद्धचरितैर्द्धरणीतलस्य कृत्वा पुनः कृतयुगश्रृ(श्रि)य-
मप्यशेषां चित्रं कथं निरु

(१५) पमः कलिवल्लभोभूत् [॥८॥*] प्राभूधै(द्धै)र्यवतः(त)त(स्त)तो
निरुपमादिन्दुर्यथा वारिधेः शुध्दात्मा परमेश्वरोन्नताशि

(१६) रः संसक्तपादः सुतः पद्मानन्दकरः प्रतापसहितो नित्योदयः
सोन्नतः पूर्व्वाद्रेरिव भा

## पत्रा २ बाजू १

(१७) [नुमानभिमतो **गोविंदराजः**] {सतां [॥९॥*] यस्मिन्सर्वे{ गुणाश्रये क्षितिपतौ श्रीराष्ट्रकूटान्वयो(ये) जा(या)ते {याद{

(१८) [ववंशवन्मधुरिपावासीदलंघ्यः] परैः दृष्टाशावधयः कृतास्य सदृशा दानेन येनोद्धृता मुक्ता [हार]

(१९) [विभूषिना स्फुटमिति] {प्रत्य{र्थिनोप्यर्थिनां [॥१०॥*] तस्मिं (स्मिन्) स्वर्गविभूषणाय जनके जा(या)ते यशःशेषतामे[कोभू]

(२०) [यसमुद्यतान्वसुमती]मंहारमाधिच्छ(त्स)या विच्छायां(यान्) सहसा व्यधत्त नृपतीनेकोपि यो द्वादशख्याता{न{

(२१) [प्यधिकप्रतापविसरै]स्संवर्तकोर्क्कानिव [॥११॥*] सन्धायाशु शि-लीमुखां स्वसमयां **वाणासनस्योपरि** प्राप्तं व

(२२) [द्धितवंधुजीवविभवं] पद्माभिवृद्ध्यान्वितं सन्नक्षत्रमुदीक्ष्य यं शर-द्दतुं पर्जन्यवद्गूर्जरो नष्टः क्वापि भया

(२३) [त्तथा न समरं स्व] {प्नेपि{ पश्येद्यथा [॥ १२॥* ] विंध्या (न्ध्या)द्रेः कटके निविष्टकटकं श्रुत्वा चरैर्ये निजैः स्वं देशं स

(२४) [मुपा]गत(तं) ध्रुवमिव ज्ञात्वा भिया प्रेरितः **माराशर्व्वमहीपति** र्द्रुतमगादप्राप्तपूर्व्वैः परैः { यस्ये }

(२५) {यस्ये}च्छामनुकूलयं(या) कुलधनैः पादौ प्रणामैरपि [॥१३॥*] नीत्वा **श्रीभवने** घनावनघनव्याप्ता

(२६) म्बरां प्रावृषं तस्मादागतवां(वान्) समं निजवलैरा**तुंगभद्रा**तटं तत्रस्थः [स्व*]करास्थितामपि पुनर्निःशेष

(२७) माकृष्टवां(वान्) विक्षेपैरपिचित्रमानतरिपुर्यः पल्लवानां श्रृ(श्रि)यं [॥१४॥*] संत्रासात्परचक्रराजकमगात(त्त)

---

**यस्ये** हीं अक्षरें गाळावी.

(२८) त्पूर्वसेवाविधिः व्याबद्धांजलिशे(शो)भितेन शरणं मूर्ध्ना यदंद्र(घ्रि) द्वयं यद्यद्दत्तपरार्घ्यभूषणगणैर्नाल(लं)कृत(तं) तत्तथा

(२९) मा भैषीगितिसत्यपालितयशः थि(स्थि)त्या यथा तद्गिरा [॥१५॥*] तेनेदमनिलविद्युच्चंचलमवलोक्य जीवितमसारं

(३०) क्षितिदानपरमपुण्यः प्रवर्त्तितो ब्रह्मदायोयं [॥१६॥*] स च परमभट्टारकमहाराजाधिराजपरमेश्वर[श्री]

(३१) मद्धारावर्षदेवपादानुध्यातपरमभट्टारकमहाराजाधिराजपरमेश्वरप्रभूत-वर्षपृथ्वीवल्लभश्रीगो

(३२) विन्दराजदेवः कुशली सर्वानेवं (व) यथासंबध्यमानकां (कान्) राष्ट्रपतिविषयपतिग्रामकूटायुक्तकनियुक्त

(३३) काधिकारिकमहत्तरादीं (दीन्) समादिशत्यस्तु वः संविदितं यथा श्रीमयूरखण्डीसमावासिते

**पत्रा २ बाजू २**

(३४) { न } मया मातापित्रोरात्मनश्चैहिकामुष्मिकपुण्ययशोभिवृद्धये ॥ निं(नि)म्बस्थलिवास्तव्यतचातु{ र्वि }

(३५) द्यसामान्यवच्छ(त्स)सगोत्रते(तै)ति(त्ति)रीयसब्रह्मचारि आयवच्छ-(त्स) पौत्राय श्रीधरभट्टपुत्राय महिधरभट्टाय { व }

(३६) { हु }लाविषयान्तर्गतः वहुलावारोनामा ग्रामः तस्य चाघाटनानि पूर्वतः वहुलानदी दक्षिणतः वरग्रा

---

१ या लि विषयी शंका येते कदाचित् नि ही असेल.

२ येथें मी गोत्राय असा शब्द वाचून चर्चा केली आहे. पण माझ्या एका मित्रानें माझी वाचनांत चूक झाली असून पौत्राय असें वाचन केल्यानें अर्थ जास्त सरस बसतो हे दाखवून दिलें. म्हणून मी पौत्राय असें वाचन दिलें आहे.

(३७) मः पश्चिमतः **राजउरा** ग्रामः उत्तरतः **वारीखेर** ग्रामः एवमयं चतुराघाटनोपलक्षितो ग्रामः

(३८) सोद्रंगः सपरिकरः सदण्डदशापराधः सभूतोपात्तप्रत्यायः सोत्पद्यमान-विष्टिकः सधान्यहिरण्यादेय

(३९) अचाटभटप्रावेश्यः सर्व्वराजराजकीयानामहस्तप्रक्षेपणीयः अ(आ) चन्द्रार्क्कार्ण्णवक्षितिसरित्पर्वतसमका

(४०) लीनः पुत्रपौत्रान्वयक्रमोपभौ(भो)ग्यः पूर्व्वप्रत्तदेवब्राह्मदायरहितोभ्यं (भ्य)न्तरसिद्ध्या भूमिच्छिद्रन्यायेन शक

(४१) नृपकालातीतसंवत्सरशतेषु सप्तसु द्वातृं(त्रिं)शदधिकेषु सर्व्व धारीनाम्नि संवत्सरे अ(आ)षाढवहुलअमा

(४२) वास्यां सूर्यग्रहणपर्वणि वलिचरुवैश्वयं(श्व)देवाग्निहोत्रातिथिपंचमहाय-ज्ञक्रु(क्रि)योत्सर्पणार्थं

(४३) स्नात्वा ह्योदकातिसर्गेण प्रतिपादितः यतोस्योचितया ब्रह्मदाय-स्थित्या भुंजतो भोजयतः कृ

(४४) षतो कर्षयतः प्रतिदिशतो वा न कैश्चिदल्पापि परिपंथना कार्या तथागामिभद्रनृपतिभि

(४५) रस्मद्वंश्यैरन्यैर्वा सामान्यं भूमिदानफलमवेत्य विद्युल्लोलान्यनित्यैश्व-र्याणि तृणाग्रल

(४६) ग्नजलविन्दुच(चं)चं(च)लं च जीवितं(त)माकलय्य स्वदायनिर्विशेषो यमस्मद्दायोनुमंतव्यः प्रतिपालयित

(४७) व्यश्च यश्चाज्ञानतिमिरपटलाव्व(वृ)तमतिराच्छिद्यादाच्छिद्यमानकं वा नुमोदेत सपञ्चभिर्महापात

(२४) लासवसतिर्नृपः । स पुष्णन्नर्थिसार्थस्य विविधार्थैर्म्मनोरथान् ।[।१३।।*]
(२५) सरित्सह्याद्रिसंभूता शैवैर्लिंगौर्न्निरंतरा [।*] मलप्रहारिणीत्यस्ति ता

पत्रा दुसरा बाजू दुसरी

(२६) पपापहारिणी।[।१४।।*]क्षत्रक्षेत्रक्षयोद्भूतस्फूर्ज्जद्वृजिनमार्जनात् । प्रा
(२७) प्ता परशुरामस्य स्वस्य नाम्नो यथार्थतान्(म्) । [।१५।।*] तस्यास्ती रेस्ति भगवान्
(२८) स्वयंभूर्भुक्तिमुक्तिदः । शंभुः प्रसिद्धस्त्ते(स्थौ)ल्येन गलगेस्व(श्व) रसंज्ञया ।[।१६।।*]
(२९) दत्तभक्तजनानन्दः पलसीदेशभूषणं(णः) । प्रकटीकृतमाहात्म्यस्तत्त
(३०) द्वरसमर्प्पणात् । [।१७।।*] तस्मै पूजोपचारार्थं जीर्ण्णोद्धरणकर्म्मणे । त
(३१) था चैत्रपवित्रादिपर्व्वणे सत्रसिद्धये । [।१८।।*] तत्तद्भोगविभूत्यर्थं
(३२) भक्तिनिर्भ्भरमानसः । महामाहेस्व(श्व)रः प्रादाज्जयकेशिमही
(३३) पतिः । [।१९।।*] कंपणे कालगेर्याख्ये कुपट्टोगगरिकाभिधं ।। ग्रामं त्रिभोग
(३४) संपन्नं सर्व्वबाधाविवर्ज्जितं ।[।२०।।*]नमस्यं सर्व्वलोकस्य यावदाचंद्रता
(३५) रकं । प्रसिद्धचतुराघाटं (ट)पर्व्वसीमासमन्वितं । [।२१।।*] तपो निष्ठागरिष्ठस्य
(३६) शिवशक्तेस्तपोनिधेः। वारिधारां समुस(त्सृ)ज्य पाणौ तत्पिंडिकात
(३७) टे । [।२२।।*] सर्व्वप्रधानसंमत्या पुरोहितपुरस्सरो[।*]विद्यावदातवदने

पत्रा तिसरा बाजू पहिली

(३८) विद्वद्वर्गेन्तिकस्थि(स्थि)ते ।। [२३।।*] सा(शा)के शरशराशांके प्रमादिपरिवत्सरे ।
(३९) फाल्गुने शुद्धपक्षस्य प्रतिपद्दिवसे शुभे । [।२४।।*] सूर्योपरागे सौर्येह्नि
(४०) सर्व्वपर्व्वोत्तमोत्तमे । अत्रैव चित्रचारित्रः प्राह श्रीकोंकणेश्वरः [।।*]

# कदंब २ रा जयकेशिन् ( गोवे ) याचा असोगे ताम्रपट श. १०५५



2 B. I. S. M. Collection of Copperplates No. 17 scale $\frac{1}{4}$ th



1 B. I. S. M. Collection of Copperplates No. 17

वाचावयाचें हें समजत नाहीं. या शिवाय ताम्रपट बनावट असल्यानें अनेक तऱ्हेचीं अशुद्धें इतकीं आहेत कीं तीं सुधारतांना मनुष्य बेजार होतो. या ताम्रपटांत देवनागरी अक्षरांचें जें स्वरूप आढळतें तें स्वरूप देवनागरी अक्षरांना शकाच्या सहाव्या शतकांत आलेलें नव्हतें. आणि बदामी चालुक्यांच्या ताम्रपटांत देवनागरी अक्षर वापरलेलें माझ्या आढळांत नाहीं. त्यांचे सर्व लेख कानडी वळणांत लिहिलेले आहेत.

**लेखनपद्धति–विमथनैक** हा शब्द **विमथनय्क** ( ओ.१२,१३ ) असा व **वैनतेय** हा शब्द **वय्नतेय** ( ओ. २७ ) असा लिहिला आहे. **ओ**काराबद्दल अनेक ठिकाणीं **ऐ**कार लिहिला आहे हें सांगण्याची जरूरी नाहीं. **ब** बद्दल नेहमीं व वापरला आहे उ. वल ( ओ. १२ ), विवुध ( ओ. १७), वहुभि° ( ओ. ४९ ). **ऋ** बद्दल बहुतेक **रि** वापरली आहे. उ. क्रित ( ओ. ४ ), श्रिंग ( ओ. १५ ), महान्निपति ( ओ. ४० ). **श** व **ष** यांबद्दल कित्येक ठिकाणीं **स** व **श** वापरले आहेत. उ. सरीर (ओ. ५), विसुद्ध (ओ. ८), °भिशिक्त (ओ. २०,२१), परसु° (ओ.२४); तर कांहीं ठिकाणीं **स** व **श** बद्दल **श** व **ष** वापरले आहेत. उ. °भाशित ( ओ. १८ ), शमस्त ( ओ. २५ ), पंचसतीशु ( ओ. ३४ ), शर्व्व-नमश्यं ( ओ. ३९,४०).

**भाषा**–ताम्रपट संस्कृत भाषेंत आहे. पहिला व शेवटचे २ असे श्लोक सोडले तर बाकी सर्व भाग गद्यांत आहे. भाषेचा अर्थ नीट समजत नाहीं.

**हेतू**– बहुधा चालुक्य कुलांतील विजयादित्यानें, तीन वेदांमध्यें पारंगत आणि काश्यप व गोवर्द्धन गोत्री अशा ६४ ब्राह्मणांकडे पूर्वी दिलेलें दान चालू ठेवण्यासाठीं हें दानपत्र करून दिलें असावें.

**कालनिश्चय**– या ताम्रपटांत कालाचा उल्लेख ‘ विसंत्योत्तरपंचस-तीशु सकवर्षप्रतीतीशु प्रवर्त्तमानात् विजयराज्यप्रवर्त्तमाने आनंदसंवत्सरे... पाल्गुणंप्राप्तमावाश्यां व्यतीपातव्रिहय्वातैवारे सूर्य्यग्रहणे ’ असा आहे. प्रचलित पद्धतीप्रमाणें गत शक ५२० ला कालयुक्त संवत्सर येतो. शक ५२० हें चालू वर्ष धरलें तर संवत्सर पिंगल येईल. दोन्ही प्रकारांत आनंद संवत्सर येऊं शकणार नाहीं. पण ८५ किंवा ८६ वर्षांनीं संवत्सर

राश्या क्षय करण्याची बार्हस्पत्य संवत्सरगणनेंत पद्धत आहे. या गणने-प्रमाणें चालू शक ५२० ला आनंद संवत्सर येतो. मात्र चालू शक ५२० किंवा गत ५१९ च्या फाल्गुन अमावास्येस ग्रहण येत नाहीं. योग जुळतो कीं नाहीं हें पाहिलें पाहिजे.

**स्थलनिश्चय**– दानकालीं राजाचा मुक्काम गोदावरीच्या उत्तर तीरीं **नंद्याल** गावीं होता. नंद्याल म्हणजे **नांदेड** असावें.[1] दान दिलेल्या गांवाचें नांव "**नगरशैगे**" असें आहे. नगरशैगे म्हणजे हल्लीचें **नागरसोगें**. हें गांव **उच्छिव** चाळिशींतलें होतें. उच्छिव म्हणजे **आवसा** असावें. याशिवाय या ताम्रपटांत जीं गांवें व नद्या आल्या आहेत त्या त्यांच्या प्रस्तुतच्या नांवांसह तर्कावरून पुढे देतों.

| | | |
|---|---|---|
| मुंडि= ? | जवलग्रामे=जवळगांव | धानर=धानोरें |
| अंवयग्रामे=अंबगाव | रक्ततटाक= ? | वेरिवल=वेरूळ |
| करुव= ? | तुगिंग्रामे= तुंगी | कुमारिरवैल=कुवारखेड |
| नलंद नदी= ? | | करंज=करंजे |

ही सर्व गांवें आवशाच्या जवळपास आहेत कीं नाहींत हें सूक्ष्म नकाशे मीं पाहिले नसल्यानें सांगूं शकत नाहीं. पण यांपैकीं तुंगी, धानोरें, आवसा, नागरसोगें हीं गांवें एकमेकांच्या जवळ आहेत.

**चर्चा**– या ताम्रपटांत आलेली वंशावळ व चालुक्यांची सर्वमान्य वंशावळ या पुढे मांडून दाखवितों. त्यांवरून प्रमाणभूत वंशावळ व बनावट ताम्रपटांतील वंशावळ यांत कसा फरक आहे हें चांगलें दिसून येईल.

| या ताम्रपटांतील वंशावळ | प्रामाणिक वंशावळ |
|---|---|
| पुलकेशिन् ( श. ४००–श. ४३० ) | पुलकेशिन् ( श. ४७२ सुमार ) |
| कीर्तिवर्मन् ( ४३०–४६० ) | कीर्तिवर्मन् ( ४८८–५१९ ) |
| विक्रमादित्य ( ४६०–४९० ) | २ रा पुलकेशिन् ( ५३१–५६४ ) |
| विनयादित्य ( ४९०–५२० ) | विक्रमादित्य ( ५७७–६०२ ) |
| विजयादित्य ( ५२०–५५० ) | विनयादित्य ( ६०२–६१८ ) |
| | विजयादित्य ( ६१८–६५९ ) |

[1] कर्नूल जिल्ह्यांतील नंद्यालचा येथे संबंध दिसत नाही.

प्रमाणभूत वंशावळींतील अत्यंत महत्त्वाचा पुरुष जो २ रा पुलकेशिन् तोच या ताम्रपटांत गाळला आहे. असें मानलें कीं, कीर्तिवर्मन्‌ला विक्रमादित्य या नांवाचा आणखी एक थोरला मुलगा होता ( पण कोणत्याही प्रामाणिक ताम्रपटांत कीर्तिवर्मन्‌ला विक्रमादित्य नांवाचा मुलगा होता असें सांगितलेलें नाहीं. ) तरी प्रस्तुत ताम्रपटांत जो काळ दिला आहे (श.५२०) त्याचा व वंशावळ यांचा मेळ बसत नाहीं. मी आतांच दिलेल्या वंशावळींत प्रमाणभूत वंशावळींतील लोकांचे ठरलेले काळ दिले आहेत. या काळाचा विचार केला तर दर पिढीस सरासरी ३० वर्षे येतात. या ताम्रपटांत आलेल्या पुरुषांचे ३० वर्षांच्या हिशेबानें येणारे काळ दिले आहेत. त्यांत हा ताम्रपट देणारा राजा दानकालीं नुकताच गादीवर आला होता असें धरलें आहे. दोन्ही वंशावळींतील कालाचा विचार केला तर असें दिसतें कीं, कोणत्याही एका पुरुषाच्या कालाच्या बाबतींत ८० ते १०० वर्षांचें अंतर पडतें. तेव्हां ताम्रपट प्रामाणिक कसा मानतां येईल ? २ ऱ्या पुलकेशिन्‌पुढल्या पिढ्या मात्र दोन्हींकडे सारख्याच आहेत.

या ताम्रपटांत जीं उपपदें आलीं आहेत तीं अशींच कृत्रिम आहेत हें तुलना केल्यास चांगलें दिसून येईल. भा. इ. सं. मंडळाच्या ९ व्या वर्षाच्या २ ऱ्या अंकांत चालुक्य विजयादित्य याचा बोपगांव ताम्रपट छापला आहे. ताम्रपट खरा आहे. यामुळें तुलनेकरितां तो घेण्यास हरकत नाहीं. दोन्ही ताम्रपटांतील पुरुष व त्यांचीं सर्व उपपदें खालील कोष्टकांत दिलीं आहेत.

| बोपगांव ताम्रपट | बोरगांव ताम्रपट |
| --- | --- |
| १ श्री पुलकेशिवल्लभ महाराज | १ समस्तभुवनाश्रय श्रीपृथ्वीवल्लभ महाराजाधिराज परमेश्वर परमभट्टारक श्री पुलकेशीवल्लभ महाराज |
| \| | \| |
| २ श्रीकीर्तिवर्म पृथिवीवल्लभ महाराज | २ परमे०, परमस्तुत्य, समस्त० श्रीपृथ्वी०महाराजा० परमे० परमभट्टा० श्रीकीर्तिवर्ममहाराज |
| \| | \| |
| ३ सत्याश्रय श्रीपृथिवी० महाराजा० परमे० | ३ परमे० परम० समस्त० श्रीपृथ्वी० महाराजा० परमे०परम |
| \| | |
| ४ विक्रमादित्य सत्या० श्रीपृथिवी० महाराजा० परमे० भट्टा० | |

|

५ विनयादित्य सत्या० श्रीपृथिवी० महाराजा० परमे० भट्टा०

|

६ विजयादित्य सत्या० श्रीपृथिवी० महाराजा० परमे० भट्टा०

भट्टा० श्रीविक्रमादित्य परमे०

४ समस्त० श्रीपृथ्वी० महाराजा० परमे० परम० श्रीविनयादित्य सत्या० परमे०

|

५ समस्तराजाश्रय परमे० समस्त० श्रीपृथ्वी० महाराजा० परमे० परम भट्टा० श्रीविजयादित्य परमे०

या यादीवरून दिसून येईल कीं, बोरगांव ताम्रपटांतील उपपदें संख्येनें जास्त आहेत; शिवाय समस्तभुवनाश्रय, समस्तराजाश्रय, परमस्तुत्य व परमभट्टारक हीं उपपदें बोपगांव ताम्रपटांत मुळींच नाहींत. येवढेंच नव्हे तर बदामी चालुक्यांच्या कोणत्याही प्रामाणिक लेखांत नाहींत. भट्टारक हें उपपद शेवटच्या तिघांनाच लावलें आहे. सत्याश्रय, परमेश्वर, व महाराजाधिराज हीं पहिल्या दोघांना नाहींत. परमेश्वर हें उपपद २ ऱ्या पुलकेशिन्नें हर्षाचा पराभव केल्यावर त्यास मिळालें असें बदामी चालुक्यांच्या अनेक लेखांतून सांगितलें आहे. याच चालुक्यांचे जों जों जास्त जुने लेख पहावे तों तों उपपदांच्या बाबतींत तर याहूनही साधेपणा दृष्टीस पडतो. उ. मंडळानें नुकत्याच प्रसिद्ध केलेल्या व मी लिहिलेल्या पुस्तकांतील लोहणेर ताम्रपटांत पहिला पुलकेशिन्, कीर्तिवर्मन् व दुसरा पुलकेशिन् यांचा पुलिकेशिवल्लभ महाराज, कीर्तिवर्मा, सत्याश्रय पृथिवीवल्लभ महाराज, अशा साध्या स्वरूपांत उल्लेख आला आहे[1]. यावरून बोरगांव ताम्रपट बनावट असावा असें वाटतें.

**लेखक**—ताम्रपटांतील मजकुराच्या शेवटीं ' महासंधिविग्रहि [ क* ] श्रीरामपुण्यवल्लभलिखितं ' असें म्हटलें आहे. बदामी चालुक्यांपैकीं विनयादित्याच्या जेजूरी व हरिहर या ताम्रपटांचा लेखक श्रीरामपुण्यवल्लभ आहे[2]. पण हे ताम्रपट शक ६०० च्या नंतरचे आहेत व हा ताम्रपट तर ५२० चा आहे. तेव्हां याचा मेळ कसा बसणार ?

---

१ द. म. इ. सा. सं. १ पृ. ४–५

२ एपि. इंडि. व्हॉ. १९ व इंडि. अँटि. व्हॉ. ७

## वाचन[1]

### १ ला पत्रा २ री बाजू.

( १ ) ओं[2] स्वस्ति जयन्त्यानिष्क्रितं विष्णोर्व्वाराहं क्षैभिताण्णवं[ ।* ] दक्षिणैन्नतदंष्ट्राग्रविभ्रान्तभुव
( २ ) न वपुः । श्रीमत् भुवनजनसंस्तुयमानव्यासगैत्र हारीतिपुत्रान् समस्तानेकमात्राभि
( ३ ) सप्तमात्रभिरचिरचितवर्द्धितानां कार्त्तिकेयपरिरक्षणप्राप्तकल्लयाणां पर-स्वरान् भ
( ४ ) गवान्नारयणप्रसादासमासाधितवराहलांच्छनक्षणणावशीक्रितमशेषमही-भ्रिता
( ५ ) नां चालुक्यानां कुलमलिन्द्धविष्णोरश्वेमधीरवभ्रितस्नानपवित्रीक्रित-गात्रसरीरसा
( ६ ) समस्तभुवनाश्रयश्रीप्रिथ्वीवल्लभमहाराजाधिराजपरमेश्वरप
( ७ ) रमभट्टारकश्रीपुलकेशीवल्लभमहारस्य सुतः पराक्रमकौ
( ८ ) न्तेयंनरशाधिपरत्रिपमंडलफणिविद्धविसुद्धकीर्त्तित्रिपासिरदर्प्पणभ्व
( ९ ) जविराजमनजयमंगलपटहसंकनादनंदित दिलीपराजसुजनजन
(१०) सरैवरराजहंस परमेश्वरपरमस्तुत्यसमस्तभुवनाश्रयश्रीपिथ्वीवल्लभ
(११) माहराजाधिराजपरमेश्वरपरमभट्टारकश्रीकीर्त्तिवर्म्ममहाज तत्प्रियसु
(१२) तस्य अनेकन्रिपमणिमकुटमरीचिरंजितपादपीठरायवलजलविम
(१३) थनव्क मंदरदर्प्पोधावैं[3]रिसिरकंदुकविनैदन्त्रिगमदमैदरिपुरायगज

### २ रा पत्रा १ ली बाजू

(१४) कुंभिकुंभस्तलविदुविदारणनिजखर्ग्गचंचूर्णितक्रितविराजमानमानमानो

---

१ हें वाचन ताम्रपटावरून केलें आहे. ताम्रपटांत अनेक अशुद्धे आहेत तीं दुरुस्त करणें अतिशय जिकिरीचें आहे; म्हणून तीं जशींच्या तशींच ठेविलीं आहेत.
२ ओं खुणेनें दाखविला आहे. ३ येथें वै च्या पाठीमागें उभी रेघ आहे

(१५) न्नताश्रिंगस्य परमेश्वरपरमस्तुत्यसमस्तभुवनाश्रयश्रीप्रिथ्वीवल्लभमहाराज

(१६) धिराजपरमेश्वरपरमभट्टारकश्रीविक्रमादित्यपरमेश्वर ततसूनुस[1]

(१७) मधिगतानिजविजयसमुचितविततराज्यविभवस्य विवुधरासिकसमरग

(१८) पुगतरिपुनरपतिसमुपलब्धकीर्तिपताकावभाशितदिगन्तरस्य हिम

(१९) करकुलविलयहेतुपल्लवपतिपराजयानान्तरपारिग्रीहितकां

(२०) चिपुरंचचूर्ण्णितचेरचोलपांड्यमाणिमकुटकुटकिरणसनिलाभिशि

(२१) क्तचरणकमलस्य त्रिसमुद्रमध्यवर्त्तिभुवनमंडलाधीश्वरस्य पितुराज्ञो

(२२) पनितलशेषस्य श्वेतानिहत्य फलमारि(त्रि ?)समुद्भवमात्राभिराज्यफल

(२३) मधिष्टेसर्समधिविषयप्रसमनादिहिततत्मात्रराज्ञोपनाश्रिम्तान्त

(२४) रतुलतुधादैविध्वर इव श्रीरामतद्वासुदेव इव त्रिपकंठगतुपरसु

१ या पुढील पाच ओळींशी जेजुरी ताम्रपटांतील पुढील मजकुराची तुलना करणे बोधप्रद आहे. मात्र अशी तुलना करताना एक गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे की, या ताम्रपटांतील हा मजकूर विक्रमादित्याच्या मुलासंबंधी आहे. तर तुलनेसाठी दिलेला जेजुरी ताम्रपटांतील मजकूर विक्रमादित्यासबंधी आहे.

' विक्रमादित्यपरमेश्वरभट्टारकस्य पविसहाया(य)साहसमात्र समधिट( ग )तानिजवंशसमुचिताचितराज्यविभवस्य विविधरासितासितसमर-मुखगतरिपुनरपतिविजयसमुपलब्धकीर्त्तिपताकावभासितादिगन्तरस्य हिमकर-करविमलकुलपरिभवविलयहेतुपल्लवपतिपराजयानन्तरपरिगृहीतकाञ्चीपुरस्य प्रभावकुलिशदलितपाण्ड्यचोळकेरळधराणिधरत्रायमान(ण)मानश्रृंगस्य अन-न्यसमवनतकाञ्चीपातिमकुटकट( कूट )किरणसलीलाभिषिक्तचरणकमलस्य त्रिसमुद्रमद्ध्यवर्त्तिभुवनमण्डलाधीश्वरस्य '

२ या व या पुढील एक अशा दोन ओळींशी जेजुरी ताम्रपटांत विक्रमादित्याचा मुलगा विनयादित्य याविषयी आलेला पुढील मजकूर तुलना करण्यासारखा आहे.

' समस्तविषयप्रशमनाद्विहिततन्मनोनुरञ्जनः अत्यन्तवत्सलत्वाद्युधिष्ठिर इव श्रीरामत्वाद्वासुदेव इव नृपांकुशत्वात्परशुराम इव राजाश्रयत्वाद्भ [ रत इ ] व '

३ दै च्या पाठीमागें उभी रेघ आहे.

(२५) राम इव राजराजाश्रयैद्धरत इव शमस्तभुवनाश्रयश्रीप्रिथ्वी
(२६) वल्लभमहाराजाधिराजपरमश्वरपरमस्तुत्यश्रीविनयादित्य

२ रा पत्रा २ री बाजू

(२७) मत्याश्रयपरमेश्वर ततूप्रियसुतस्य पराक्रमवय्ननतेय दीनानाथज
(२८) नमनोनिश्चलानेकत्रिपवेदंडमस्तकपिंडखंडितखर्गनखसंहारि
(२९) तकैंकलाद्यानेकमालवखलिंगात्रिपदर्प्पोछचाटणाभुजवलावष्टंभ
(३०) नान्याविधेयाक्तिंतंजयजयछत्रचामरासिंहासनमस्तकास्तितस
(३१) मस्तराजाश्रयपरमेश्वरसमस्तभुवनाश्रयश्रीप्रिथ्वीवल्लभमहार
(३२) जाधिराजपरमेश्वरपरमभट्टारकश्रीविजयादित्यपरमेश्वर स
(३३) कलकटकसामन्तसुकसंकथाविनोदराज्यप्रवर्द्धमाने विंसत्यो
(३४) त्तरपंचसतीशु सकवर्षप्रतीतीशु प्रवर्त्तमानात् विजयरा
(३५) ज्यप्रवर्त्तमाने आनंदसंवत्सरे वर्त्तमानां गोदावरीनद्युत्तरतटे नंद्याल
(३६) मासन्ने पाल्गुणप्रासमावाश्यां व्यतीपातत्रिहस्वातैवारे[1] सूर्य्यग्रहणे राज
(३७) विदिताविप्रकुलविमलयज्ञोपवीतनायकवाजिकाश्यपगैत्रगैवर्द्धनात्रि
(३८) वेदपारगा उच्छिवचत्वारिंसत् विषयाभ्यन्तरे नगरशैंगेनाम ग्रामे
(३९) त्रटिके स्वेतछत्रसमेतपादप्रक्षालनधारापूर्व्वकं शर्व्वनम

३ रा पत्रा १ ली बाजू

(४०) इयं महात्रिपातदित्तयातिगैवर्द्धनात्रिवेदपारगा तद्दानं त्रवुषष्टिद्विजानां
(४१) पुनर्द्दानं दत्तयेति तद्ग्रामसीमान्तरे पूर्व्वदिशै भागे मुंढिनामग्रामे तस्य
(४२) पश्चिमत नदश्रेत प्रमाणं। तस्य दक्षिणत नदनदसंगम प्रमाणं । तस्य दक्षिणत अं
(४३) वयग्रामे तस्य पश्चिमत वहुपाषाणपुंज प्रमाणं । तस्य पश्चिमत करुव ग्रामे तस्यै

---

१ तै च्या पाठीमागें उभी रेघ आहे.

(४४) त्तर नदश्चैत प्रमाणं । तस्य पश्चिमत नर्ळेनदिनदसंगम प्रमाणं । तस्य दक्षिणत ज

(४५) वलग्रामे तस्यैत्तरत नदश्चैत प्रमाणं । तस्य पश्चिमत रक्ततटाक प्रमाणं । तस्यै

(४६) त्तरत पाषाणपुंज प्रमाणं। तस्यैत्तरत तुगिंग्रामे तस्य पूर्व्वत नदिनदसंग

(४७) मप्रमाणं । तस्यैत्तर धानरग्रामे तस्य पूर्व्व नदश्चैत प्रमाणं । तस्यैत्तर वैरि

(४८) वलग्रामे तस्य पूर्व्व तटाक प्रमाणं । तस्यैत्तर उच्छिवग्रामे त पूर्व त्रिलैचनकुमारिखैलप्र

(४९) माणं । तस्य पूर्व्व करंजग्रामे तस्य दक्षिण पाषाणपुंजं । भूमिप्रमाणं अष्टादससहस्त्रं ॥ वहुभिवसु

(५०) धा दत्तं राजभिस्सगरादिभिः यस्य यस्य यदा भूमि तस्य तस्य तदा फ

(५१) लं ॥ स्वदत्तं परदत्तं वा यै हरन्ति वसुंधरा षर्ष्टिवर्षसहस्त्राणि विष्ठा

(५२) यां जायते क्रिमिः ॥ महासांधिविग्रहिश्रीरामपुण्यवल्लभलिखितं ॥

---

# १६ दौलताबाद ताम्रपटाविषयीं एक टिपण

( श्री. ग. ह. खरे. )

परभणी ताम्रपटावर मंडळाच्या गेल्या म्हणजे १९ व्या संमेलनांत निबंध वाचला होता हें वाचकांच्या लक्षांत असेलच. त्यावेळीं त्या ताम्रपटांत आलेल्या सर्व गांवांचा पत्ता मला लागला नव्हता. पण त्यावेळीं मी जी कल्पना केली होती त्या कल्पनेच्या आधारानें शोध करीत असतां त्या ताम्रपटांतील गांवांचा तर उलगडा झालाच, पण आण खीही एका ताम्रपटांतील गांवांचा उलगडा होत आहे तो असा—

**हैद्राबाद ऑर्किऑलॉजिकल सिरीज** मध्यें **कल्याणीचा चालुक्य** राजा **जगदेकमल्ल** याचा **दौलताबाद** ताम्रपट छापला आहे

---

२ खै च्या पाठीमागें उभी रेघ आहे.

( क्र. २; इ. स. १९१७ ). या ताम्रपटांतील गांवें या ताम्रपटाचे संपादक श्री. **का. ना. दीक्षित** व **प्रो. दे. रा. भांडारकर** यांस ओळखतां आलीं नाहींत. याचें कारण म्हणजे तीं गावें कोठें पहावयाचीं हें ताम्रपटावरून मुळींच ध्यानांत येत नाहीं. जेव्हां सोनवडे ताम्रपटावरील माझा निबंध छापून प्रसिद्ध झाला तेव्हां मला हा ताम्रपट पहावा लागला होता. या ताम्रपटांतील स्थलांचा निश्चय झालेला नाहीं हें माझ्या ध्यानांत होतें. पण परभणी ताम्रपटांतील एका गांवाचा उल्लेख या ताम्रपटांत आला असेल अशी माझी कल्पना नव्हती. **धारवाड** येथील विद्वान कार्यकर्ते वकील श्री. **द. प. करमरकर** यांनीं माझ्या एका पत्रास उत्तर घालून त्यांत कळविलें कीं, दौलताबाद ताम्रपटांत **सव्वि** असा जो देश आला आहे तो व परभणी ताम्रपटांतील **सब्बि** हे एकच असावेत. **दौलताबाद** ताम्रपटाच्या धर्तीचे जे इतर लेख आहेत त्यांत व दौलताबाद ताम्रपटांत **ब** बद्दल **व** वापरला आहे. तेव्हा **सब्बि** व **सव्वि** हीं नांवें एकदेशवाचक आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. यांतही थोडा श्लेष आहेच. परभणी ताम्रपटांत **सब्बिदेशसहस्र** असा उल्लेख आहे; तर दौलताबाद ताम्रपटांत नुसता **सव्विदेश** असा उल्लेख आहे. पण हा फरक विशेष महत्त्वाचा आहे असें वाटत नाहीं. या देशनामाशिवाय पुढील ग्रामनामें या ताम्रपटांत आलीं आहेत.

**आत्कूरुसप्तति**= ज्या देशभागांत दान केलेलें गांव आहे त्याचें नांव.

**नकरेगुम्मलु**= दान केलेलें गांव

**मुच्चुंगुरुंकि**= दान केलेल्या गांवाच्या पूर्वेचें गांव

**परुंवद्या**= ,, ,, ,, दक्षिणेचें ,,

**कोप्पडा**= ,, ,, ,, पश्चिमेचें ,,

**गोट्रणमिट्टा**= ,, ,, ,, उत्तरेचें ,,

**पुलगुभुंकेरे**= दान करताना जेथें राजाचा मुक्काम होता तें गांव. हें भीमेच्या उत्तरतीरावर होतं असेंही ताम्रपटांत सांगितलें आहे.

**अर्ल्लरु**= ज्या तीनशें गांवांच्या गटांत राजाचा मुक्काम झालेले गांव होतें त्या गटांतील मुख्य गांव.

**कोर्ल्लूरु**= ज्या बारा गांवांच्या गटांत राजाचा मुक्काम झालेलें गांव होतें त्या गटाचें मुख्य गांव.

दान केलेलें व त्याच्या भोंवतालचीं गावें शोधण्याच्या बाबतींत वरील संपादकद्वय म्हणतात कीं, मुच्चुंगुर्रुकि हें नाव हीं गावें गुलबुर्ग्याच्या आसपास कोठें तरी शोधिलीं पाहिजेत असें सुचवितें. कारण **गुर्की** अंत्य-पद असलेलीं गावांचीं नावें सामान्यतः त्या बाजूस आढळतात. मला वाटतें हीं गावें परभणी ताम्रपटांतील गावांच्या आसपास पाहिलीं पाहिजेत. कारण ( १ ) सब्बि हें देशनाम दोन्ही ताम्रपटांत एकच आहे व ( २ ) मिट्टा अंत्यपद असलेलीं गावें वारंगळच्या पश्चिमेस आहेत. उदाहरणार्थ **हैद्राबाद** संस्थानापैकीं करीमनगर जिल्ह्यांतील **राजगोपाळ**पेठेच्या आग्नेयीस सुमारें ५ मैलांवर नरमिट्टा ( Nurmitta ) हें गांव आहे. मी स्वतः वरील विचारसरणीच्या अनुरोधानें शोध करीत असतां मला तीन गावें ताम्रपटांतील नावांशीं जमणारीं अशी आढळलीं. पैकीं **कोप्पडा**चें हल्लींचें नाव Koyada व अक्षांशरेखांश ७९,९,१८,११ आणि **गोट्टणमिट्टा**चें हल्लींचें नांव Gotlamitta व अक्षांशरेखांश ७९, १०॥; १८, १३ असे आहेत. हीं दोन्ही गावें राजगोपाळपेठेच्या ईशान्येस आहेत. याशिवाय **कुंट आत्कूर** व **आत्कूर** अशीं दोन गावें आत्कूरु या नावाशीं जुळणारीं आहेत. पण तीं वरील २ गावांपासून बरींच लांब आहेत. मजपाशीं अतिशय सूक्ष्म नकाशे नाहींत. पण ज्यांपाशीं ते असतील त्यांस आणखीही गावें या गावांच्या आसपास सांपडतील.

या गावांच्या बाबतींत हैद्राबाद येथील एंजिनिअर श्री म.दा.गाडगीळ यांस पृच्छा केली असता त्यांनी पत्र पाठवून कळविलें आहे कीं, या ताम्रपटांतील गावें ५६ $\frac{\text{''}}{७}$ या नकाशांत सांपडतात तीं अशीं– नकरेगुम्मलु= Nakarkomla, परुँवया=Pariwada कोप्पडा=Koheda, गोट्टणमिट्टा= Gotlamitta ( श्री. गाडगीळ यांचें ता. ४।४।३२ चें पत्र ).

---

# १७ चालुक्य अरिकेसरिन् याचा परभणी ताम्रपट श. ८८८

( श्री. ग. ह. खरे व श्री. शं. ना. जोशी. )

**उपलब्धिः**– प्रस्तुत ताम्रपट श्री. शं. ना. जोशी यांनीं परभणी येथून

श्री. नानल वकील यांच्या करवीं आणिला. यांतील वाचन दोघांनीं केलें असून टीपा, भाषांतर व सर्व विवेचन हीं श्री. खरे यांचीं आहेत.

**ताम्रपटवर्णनः**– या ताम्रपटाचे ३ पत्रे असून त्यांची लांबी, रुंदी व जाडी अनुक्रमें ११½", ५७/८" आणि १/८" आहे. ज्या कडींत पत्रे ओवले आहेत तिचा व्यास ४¼" असून सळईची जाडी ½" आहे कडीच्या जोडावर २½" व्यासाची मुद्रा असून तीवर ' श्रीमदरिकेसरिणः' हा मजकूर नागरी लिपींत लिहिलेला आहे. या मजकुराखालीं वाममुख व उर्ध्वपुच्छ डुक्कर असून त्या खालीं डावीकडून उजवीकडे क्रमानें शंख, सूर्य, चंद्र आणि अंकुश यांचीं चित्रें खोदलीं आहेत. पहिल्या व तिसऱ्या पत्र्यांच्या आंतील बाजू व दुसऱ्याच्या दोन्ही बाजू लिहिलेल्या आहे. लिहिलेल्या ४ बाजूंवर अनुक्रमें १४, १४, १३, १० ओळी आहेत. पत्र्यांच्या कडा उंचावलेल्या असल्यामुळें लेखन सुरक्षित रहावयास पाहिजे होतें. पण दुर्दैवानें तसें झालेलें नाहीं.

**अक्षरवटिकाः**– यातील लिपी कानडी असून ९ व्या शतकांतील इतर प्रामाणिक लेखांशीं जुळणारी आहे. **म** दोन प्रकारचा काढला आहे. पैकीं एक प्रकारचा म मन्दिरं ( ओ. २ ), यशोधाम ( ओ. २७ ), या व इतर शब्दांत असून दुसरा प्रकार कमनीय (ओ ११), यथार्थमुच्चे ( ओ १२ ), नामधेय ( ओ. ३७ ) या व आणखी कांहीं शब्दांत आढळतो. **व**ही दोन प्रकारचा आढळतो. **य** हें अक्षर स्वतंत्र काढतांना वेगळें काढलें आहे व जोडतांना निराळ्याच पद्धतीनें काढलें आहे.

**लेखनपद्धतिः**– कांहीं ठिकाणीं जिव्हामूलीय आला आहे. उ. तेजᳵकान्ति ( ओ. ५ ), सुतᳵकमनीय (ओ ११), शिरᳵकुट्टाक (ओ.१४ ), त्रिनेत्रयोᳵकार्त्तिकेय ( ओ. २० ), उपनिषदᳵकविता ( ओ. २८ ), क्वचित् ठिकाणीं उपध्मानीय आला आहे. उ० श्रियᳶपात्र ( ओ. ५ ), भीमᳶपाण्डव ( ओ. ८ ). कांहीं ठिकाणीं अनुस्वाराबद्दल परसवर्ण केला आहे. उ० पात्रन्तस्या ( ओ. ५ ), निळयन्तं ( ओ. ९ ), धारन्दत्तः (ओ. ४२) सामान्योयन्धर्म्म ( ओ. ४४ ), वसुन्धराम् ( ओ. ४९ ). कित्येक जागीं विसर्गाबद्दल परसवर्ण लिहिला आहे. आदर्शस्समस्त ( ओ. २७ ), चरणस्सकळ ( ओ. २९), राजभिस्सगरा ( ओ. ४६ ), विनयस्स (ओ. २०). रेफापुढील अक्षरास सामान्यतः द्वित्त्व आहे; पण अपवादही आहेत. उ०

बभूवुर्बहवः ( ओ. २५ ), आदर्श ( ओ. २७ ), स्वस्त्यकाळवर्ष (ओ.३१) अनेक ठिकाणीं ल बद्दल ळ वापरला आहे.

**भाषा:–** संस्कृत. पहिल्या २७ ओळीपर्यंत पद्य, पुढें ४४ ओळीपर्यंत गद्य, पुढें ५० ओळीपर्यंत पद्य व पुढें पुन्हां गद्य असा क्रम आहे.

**दानहेतू:–** दान देण्याचा हेतू पुढील प्रमाणें सांगितलेला आहे. लंबुळपाटक नावाचें एक गाव असून तें दान देणारा जो अरिकेसरिन् त्याच्या राजधानीचें शहर होतें. त्यांत शुभधामजिनालय नावाचा एक जैन बास्ति होता. या बास्तिविषयीचीं खंडस्फुटित, नवसुधाकर्म, बळि आणि नैवेद्य हीं कर्में चालावींत म्हणून एक गाव दान करण्यांत आलें आहे. दान करणारा अरिकेसरिन् हा आहे. काल श. ८८८.

**कालनिश्चय:–** ताम्रपटांत कालाचा उल्लेख शक ८८८, क्षय संवत्सर, वैशाख पौर्णिमा, बुधवार असा आहे. पैकीं गत शक ८८८ ला क्षय संवत्सर येत आहे. पण वैशाख पौर्णिमेस बुधवार येत नसून रविवार येत आहे. याची इंग्रजी तारीख इ. स. ९६६ एप्रिल ८ ही आहे. अर्थात् वार सांगण्याचा चुकला आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

**स्थलनिश्चय:–** ताम्रपटांत पुढील गावें आलीं आहेत. [ **लें** ] **बुळपाटक**=३रा अरिकेसरिन् याच्या राजधानीचें गाव. याच गावांतील जिनालयास **वनिकटुपुलु** हें गाव दान दिलें आहे. **सब्बिदेशसहस्रांत** हें गाव होतें. **रेपाकद्वादश** या पोटभागांत तेंच दान दिलेलें गाव होतें. **दरियूरु** हें दान दिलेल्या गावाच्या पूर्वेचें गाव. **कट्टाकूरु** हें दानभूत गावाच्या उत्तरेचें गाव. **वेळ्ळाळपट्टु** हें दानभूत गावाच्या पश्चिमेचें गाव. **इळिंदिकुंट** हें दानभूत गावाच्या दक्षिणेचें गाव. अशी एकंदर आठ ग्रामनामें दानाचें वर्णन करतांना आलेलीं आहेत. पैकीं [ लें ] बुळपाटक, रेपाक व कट्टाकूरु हीं तीन गावें, करीमनगर जिल्ह्यांत ( हैद्राबाद संस्थानपैकीं ) मला सांपडलीं. पण बाकीचीं सांपडेनात. यामुळें माझी गावांची ओळख चुकली तर नाहींना अशी शंका येई. पण या शंकेचें निरसन लवकरच झालें. वरील गावांविषयीं व ताम्रपटाविषयीं माहिती देणारा एक लेख मी निजामविजयांत प्रसिद्ध केला. (ता. ११। ८।३१). त्यांत मी वरील गावांविषयीं माझा तर्क प्रसिद्ध करून वाचकांस विनंति केली होती कीं, त्यांनीं माझा तर्क खोटा किंवा खरा आहे हें सांगून ताम्रपटांतील गावांचा निश्चय करण्यास मदत करावी. या लेखास उत्तर

म्हणून एक पत्र हैद्राबाद येथील एंजिनियर **श्री. म. द्रा. गाडगीळ यांनीं** धाडलें (ता. १३।९।३१.). त्यांत त्यांनीं माझा तर्क बरोबर असल्याचें लिहून ताम्रपटांतील गावें दाखविणारा नकाशा पाठविला. त्यावरून तर एकंदर ६ गावें सांपडलीं. फक्त **साब्बि** व **दरियूरु** हीं दोन नावें सांपडलीं नाहींत. बाकी सहा गावांचीं नकाशांतील नावें Wemalwada, Wontudpulla, Reapac, Kutkoor, Vallamputla, Illandakoonta अशीं आहेत.

**इतरः**– शेवटच्या दोन ओळींत (५० व ५१) हें दान देणारा, सांगणारा व खोदणारा अशा तिघांची माहिती दिली आहे. पैकीं दान देणारा **अरिकेसरिन्** आहे हें एकदां स्पष्ट झालें असूनही पुन्हा ५० व्या ओळींत 'अरिकेसरिणा दत्तं' असें म्हटलें आहे. या शेऱ्याची आवश्यकता होतीच असें वाटत नाहीं. या दानपत्राची रचना करणारा **पेद्दणभट्ट** नावाचा कवि आहे. याच्या विषयीं **कथितं कविपेद्दणेन भट्टेन** असें म्हटलें आहे. पण येथें कथितं याचा अर्थ रचितं असाच असावासें वाटतें. वेमुलवाडा शिलालेखांवरून तन्त्रपाल नागमार्य याचा मुलगा पेद्दण नामधारी होता असें दिसतें. शिलालेखांतील व ताम्रपटांतील पेद्दण एकच असतील काय ? खोदणाराचें नांव **रेव** असें असून शुभधाम जिनालयाशीं म्हणजे ज्या जिनालयाच्या योगक्षेमाकरितां दान दिलें आहे त्या जिनमंदिराशीं याचा कांहीं तरी जवळचा संबंध असावा असें 'शुभधाम-जिनाळयस्य' या पदावरून उघड होत आहे.

**चर्चाः**– हा ताम्रपट अनेक दृष्टींनीं महत्त्वाचा आहे. हा ज्या कुलाचा आहे त्याची माहिती माझ्या समजुतीप्रमाणें पंपाचें[१] 'विक्र-

१ हा दिगंबरजैनपंथी कवी असून मूळचा वेंगी प्रांतांतील राहणारा होता. यानें आपला आश्रयदाता जो २ रा अरिकेसरिन् त्याच्या सांगण्यावरून भारत किंवा विक्रमार्जुनविजय हा ग्रंथ लिहिला. हा ग्रंथ लिहिल्याबद्दल त्यास २ऱ्या अरिकेसरिन्नें बच्चेसहस्र या देशविभागांतील धर्मऊरु हें गाव बक्षिस दिलें. पंपानें आपल्या ग्रंथांत खाली दिलेल्या वंशावळींतील २ऱ्या अरिकेसरिन्पर्यंतच्या पुरुषांची माहिती दिली आहे. पंपानें हा ग्रंथ श. ८६३ मध्यें पुलिगेरे–हल्लींचें लक्ष्मेश्वर–येथील सुंदर कानडींत रचिला. मी पंपभारताच्या राइस संपादित व कर्नाटक साहित्य परिषत्संपादित अशा दोन्ही प्रतीचा उपयोग केला आहे.

मार्जुनविजय ' किंवा ' पंपभारत ', सोमदेवसूरीचें[१] ' यशस्तिलक, ' प्रस्तुत ताम्रपट, वेमुलवाडा शिलालेख[२] व कोल्लिपारा दानपत्र[२] या पांच ठिकाणीं मुख्यतः आली आहे. चामुंडपुराण व इतर साधनें यांत या कुलाविषयीं कांहीं माहिती आल्याचें कै. डॉ. का. बा. पाठक हे म्हणत असत. पण मला ती माहिती मिळालेली नाहीं. या सर्व साधनांचा अभ्यास करीत असतां मजपुढें जे प्रश्न उभे राहिले त्यांची उत्तरें यथामति देत आहे. तत्पूर्वी वरील ५ आधारांत जी माहिती आली आहे ती कोष्टकरूपानें पुढें देतों. तसेंच तीविषयीं दुसऱ्या कोणी मतभेद प्रकट केला असल्यास तेंही नमूद करतों.

## पंपभारत

चालुक्य वंश

(१) युद्धमल्ल– (१) १। लक्ष प्रदेशावर राज्य करतो, (२) ५०० हत्तींना तेलाची आंघोळ घालतो.
|
(२) अरिकेसरि– वेंगीच्या प्रधानासह निरुपम देवाच्या राज्यावर आक्रमण करतो.
| |
(३) नरसिंग, नरसिंह (४) भद्रदेव
|
(५) दुग्धमल्ल (युद्धमल्ल)
|
(६) बद्देग—भद्रदेव– (१) ४२ लढाया मारतो,
(२) सोळदगंड ही पदवी मिळवतो,
(३) भीमास पाण्यांत शिरून पकडतो
|
(७) दुग्धमल्ल (युद्धमल्ल)
|
(८) नरसिंह, कलि नरसिंह, नरसिंग, नरग– (१) सुभद्र मुनीचें

१ हाही एक दिगंबर जैन कवी असून यानें यशस्तिलकचंपू, नीतिवाक्यामृत, युक्तिचिंतामणि, वगैरे संस्कृत ग्रंथ लिहिले आहेत. यानें यशस्तिलकचंपूच्या शेवटीं स्वतःविषयी व ग्रंथरचनेविषयी कांही माहिती दिली आहे. तीवरून यानें वरील चंपूकाव्य, श. ८८१ मध्यें राष्ट्रकूट राजा श्रीकृष्ण हा मेल्पाटी येथें राज्य करीत असतांना आणि त्याचा सामंत व अरिकेसरिचा पहिला मुलगा बद्यग हा गंगधारा येथें राज्य करीत असतांना, तयार केलें असें दिसतें.

2 J. Andhra historical research Society Vol. VI pp. 185, 189.

प्रतिबिंब, ( २ ) लाळ शरण येतात,( ३ ) सात माळल ( माळव ) मुख्यांना लुटतो, घूर्ज्जरराज सैन्याला पळवून लावतो व गंगेच्या पाण्यानें घोड्यांना न्हाऊं घालतो, ( ५ ) महीपाल पळून जातो, ( ६ ) याचा मित्र संगाचा नाश करतो, ( ७ ) याची बायको जाकव्वे.

|

( ९ ) अरिकेसरि किंवा अरिग– गोज्जिग किंवा गुज्जिग यापा-
| सून विजयादित्याचें रक्षण करतो.

( १० ) वद्दिग ( १ ) अरिकेसरिन्चा प्रथम पुत्र ( २ ) राजधानी गंगधारा( यशास्तिलकावरून )

( ४ ) डॉ. फ्लीट यांच्या मतें नरसिंहभद्रदेव हें एकच नाव असून तें पहिल्या अरिकेसरिन्च्या मुलाचें नांव होतें असें त्यांनीं म्हटलें आहे. ( डिनॅस्टिज् ऑफ दि कॅनरीज डिस्ट्रिक्टस् पृ. ३८० ). पण हें विधान अगदींच चुकीचें आहे हें सहज ध्यानांत येईल. (८,२) ही गोष्ट डॉ. फ्लीट देत नाहींत. ( ८,६ ) ही गोष्ट डॉ. फ्लीट देत नाहींत व राइस शंका प्रगट करून देतात ( पंपभारत, प्रस्तावना पृ. ४ पाद्टीप १ ). (८,७) डॉ. फ्लीट याच्या बायकोचें नाव चंद्रानना असें देतात. राइस जातव्वे असें देतात ( पंपभारत, प्रस्ता. पृ. ४ ). श्री. आर. नरसिंहाचार्य जाकव्वे असें देतात. मूळांत पहिल्या आश्वासाच्या ३९ व्या कवितेंत जाकव्वे किंवा जातव्वे असा कोणताच शब्द नसून जेथें हा शब्द असावयाचा त्या दुसऱ्या ओळींत कांहीं जागा मोकळी असून पुढें चंद्रानना असा शब्द आहे. त्यावरून डॉ. फ्लीट यांनीं नरसिंहाच्या बायकोचें नाव चंद्रानना असें ठरविलें आहे. पण राइस यांच्या म्हणण्याप्रमाणें तें विशेषण असणें शक्य आहे. ( ९ ) याच्या बापाचें नाव डॉ. फ्लीट युद्धमल्ल असें देतात. पण ती अगदीं स्पष्ट चूक आहे. कारण पंपभारत, प्रस्तुत ताम्रपट व वेमुलवाडा शिलालेख या तिन्ही ठिकाणीं नरसिंह असें नांव आलें आहे. ( १०,१ ) सोमदेव याला अरिकेसरिन्चा प्रथम पुत्र असें म्हणतो. अर्थात् त्याच्या मताप्रो अरिकेसरिन्ला एकापेक्षां जास्त मुलगे असावेत असें वाटतें. पण या ताम्रपटावरून भद्रदेव नावाचा अरिकेसरिन्ला एकच मुलगा होता असें दिसतें.

## परभणी ताम्रपट

### चालुक्य वंश ( आदित्यभव )

( १ ) युद्धमल्ल– ( १ ) सव्वा लक्ष प्रदेशावर राज्य करतो, ( २ ) हत्तींना तेलाची आंघोळ घालतो, ( ३ ) कालिंग त्रयासह वेंगीचें संरक्षण करतो.
|
( २ ) अरिकेसरिन्
|
( ३ ) नरसिंह– नरसिंघ आणि (४) भद्रदेव.
|
( ५ ) युद्धमल्ल
|
( ६ ) बद्दिग– ( १ ) संगमाला विद्ध करतो, ( २ ) भीमास पाण्यांतील युद्धांत पकडतो.
|
( ७ ) युद्धमल्ल
|
( ८ ) नरसिंघ
|
( ९ ) अरिकेसरिन्–(१) याची बायको प्रख्यात राष्ट्रकूट कुलांती लोकांबिका
|
(१०) भद्रदेव– बद्यग ( १ ) शुभधाम जिनालय बांधतो.
|
(११) अरिकेसरिन्– ( १ ) राजधानी लेंबुळपाटक
( २ ) सोमदेवसूरीस दान देतो.

## वेमुलवाडा शिलालेख

### चालुक्य कुळ

( १ ) विनयादित्य ऊर्फ युद्धमल्ल (१) सवा लक्ष प्रदेशाचें रक्षण करतो, ( २ ) तेलानें हत्तींना आंघोळ घालतो, ( ३ ) चित्रकूटाचें हरण करतो·
|
( २ ) अरिकेसरीश– बळेंच वेंगी देश घेतो·
( ३ ) नरसिंहवर्मन्– उर्फ राजादित्य ?
( ? ) युद्धमल्ल

( ८ ) नरसिंहदेव– ( १ ) गुर्जरराजसेना जिंकतो, ( २ )७ राजां-
ना जिंकतो.

( ९ ) अरिकेसरिन्– (१) गोविंदाच्या (गोज्जिग) राज्यहरणापासून
बिज्जाचें रक्षणे करतो, (२) बायको रेवक्का ?

## कोल्लेपारा दानपत्र.

चालुक्यवंश— रणविक्रम सत्याश्रय–– पृथिवीपति— महाराज —
विनयादित्य युद्धमल्ल— अरिकेसरिन्

मध्ययुगीन इतिहासांत ४ प्रसिद्ध चालुक्य कुलें झाली. एक बदामीचें, दुसरें कल्याणीचें, तिसरें वेंगीचें व चौथें प्रसिद्ध कानडी कवि पंप व संस्कृत कवि सोमदेवसूरि वगैरेनी उल्लेखिलेलें. यांपैकीं बदामीच्या चालुक्य कुलांतूनच वेंगीचें चालुक्य कुल उत्पन्न झालें[१]. यामुळें वेंगीच्या चालुक्य कुलाविषयीं निराळें लिहिण्याची जरूरी नाहीं. कल्याणीचे चालुक्य स्वतःस बदामी चालुक्यांचे वंशज म्हणवितात. बदामी चालुक्यकाल व कल्याणी चालुक्यकाल या दोहोंमध्यें राष्ट्रकूटांची रियासत होऊन गेली. या मधल्या काळांत या दोन्ही कुलांना जोडणारे जे पुरुष होऊन गेले त्यांविषयीं निश्चयात्मक अशी माहिती मिळत नसली तरी कल्याणी चालुक्यांच्या लेखांतून या दोन्ही कुलांची साखळी जोडून दाखविली आहे.[२] त्या साखळीशीं आपणांस सध्यां कांहीं कर्तव्य नाहीं. आपणांस फक्त चालुक्यकुल सूर्य, चंद्र, नाग वगैरे कोणत्या वंशांतील आहे हें पहावयाचें आहे. बदामीचे चालुक्य स्वतःच्या लेखांतून आपण कोणत्या वंशाचे आहों हें सांगत नाहींत. ते स्वतःस **मानव्यसगोत्राणां** असें म्हणवितात.[३] मानव्यसगोत्राणांया शब्दांतून कांही निश्चित अर्थ काढावयाचा झालाच तर तो असा निघूं शकेल कीं,

१ वेंगी येथील चालुक्य कुलाचा संस्थापक विष्णुवर्धन हा बदामीच्या चालुक्य कुलातील प्रसिद्ध राजा दुसरा पुलकेशिन याचा धाकटा भाऊ होता.

२ पहा सोनवडे ताम्रपट ( भा. इ. सं. म त्रै. व. १० अं. २ ) कवठे, दौलताबाद, मिरज हे ताम्रपट याच ताम्रपटाच्या धर्तीवर आहेत. हे कोठें प्रसिद्ध झाले आहेत ते सोनवडे ताम्रपटाच्या लेखात दिलें आहे.

३ पहा लोहणेर ताम्रपट ( दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाचीं साधनें खंड १ पृ. १ ). या लेखावरून तत्कालीन इतर ताम्रपट कोठें प्रसिद्ध झाले आहेत हेंही समजेल.

मनूच्या गोत्रांत उत्पन्न झालेले व चालुक्य यांचें गोत्र एकच होतें. पण यावरून हें कुल सूर्यवंशी कीं सोमवंशी हें ठरूं शकत नाहीं; कारण मनूपासून सर्वच मनुष्यें उत्पन्न झालीं आहेत. तेव्हां सूर्य व सोम हे दोन्ही वंश उत्पन्न झाले असल्यास नवल काय ? वेंगीचे चालुक्यही अनेक लेखांतून स्वतःस 'मानव्यसगोत्राणां' असें म्हणत असल्यानें त्यांच्या लेखांवरूनही हें चालुक्य कुल कोणत्या वंशाचें हें ठरूं शकत नाहीं. कल्याणी चालुक्यांच्या कांहीं लेखांतून 'मानव्यसगोत्राणां' असा शब्दप्रयोग येतो.[1] पण कांहीं प्रामाणिक लेख असेही आहेत कीं, ज्यांत ते स्वतःस सोमवंशी म्हणवितात.[2] कल्याणीचे चालुक्य स्वतःस बदामीच्या चालुक्यांचे वंशज म्हणवीत असल्यानें कल्याणीचे चालुक्य ज्या वंशाचे आहेत असें ठरेल त्याच वंशाचे बदामीचे चालुक्यही निदान कल्याणी चालुक्यांच्या मतानें ठरेल. आज जो ताम्रपट हातीं आला आहे त्यांत चालुक्यकुल सूर्यवंशी होतें असें सांगितलें आहे.[3] अर्थात् येथें परस्पर विरुद्ध विधानें आलीं. यामुळें ३ तर्क संभवतात. (१) चालुक्य कुल सूर्यवंशी असावें. (२) चालुक्य कुल सोमवंशी असावें. (३) दोन तऱ्हेचीं चालुक्य कुलें असून कांहीं सूर्यवंशी तर कांहीं सोमवंशी असावींत. या तीन विधानांपैकीं कोणतें विधान खरें हें, मला वाटतें, आणखी पुराव्याशिवाय निश्चयात्मक सांगतां येणार नाहीं. पण तिसरें विधान शक्य दिसत नाहीं.

हें चालुक्य कुल कोठें राज्य करीत असे हा यापुढील प्रश्न आहे. पंपानें आपला भारत किंवा विक्रमार्जुनविजय हा ग्रंथ लक्ष्मेश्वरच्या उत्तम कानडींत लिहिला असून त्यांत त्यानें आपल्या आश्रयदात्याच्या कुलाची स्तुति केली आहे. यामुळें सामान्यतः सर्वांची अशी समजूत झाली कीं, हें कुल किंवा त्यांतील कांहीं पुरुष लक्ष्मेश्वर व त्याच्या आसपासचा प्रदेश यांवर राज्य करीत असावेत. ड० राइस म्हणतात कीं, "Meanwhile certain offshoots of the family (=Chalukya) retained a measure of power in various parts, among whom were the

---

१ ५ वी टीप पहा.

२ पहा Epi. Ind. १३, ३८;१५, १०६; १५, ३४९.

३ अस्त्यादित्यभवो वंशश्चालुक्य इति विश्रुतः ( परभणी ताम्रपट )

rulers of the state of which Puligere was the capital.[१]" डॉ. फ्लीट म्हणतात, "Also, as Pampa specifically states that he wrote in the pithy Kanarese of Puligere, the village of Dharmauru may be safely identified with the neighbouring Dambal in the Dharwar District ........ and this locates the authority of Arikesarin II "[२] रा. नरसिंहाचार्य, म्हैसूरच्या आर्किऑलॉजी खात्याचे माजी सुपरिंटेंडंट म्हणतात,' ई कवि पुलिगेरेय राजनाद् चळुक्यवंशोत्पन्ननाद् अरिकेसरिय आस्थानपंडित-वागिद्दनु.[३]' डॉ. बार्नेट यांनींही हें कुल व लक्ष्मेश्वर यांचा खात्रीनें संबंध होता असें समजून लक्ष्मेश्वर येथील एक लेख संपादित असतां या कुलावर एक टीप दिली आहे.[४] या टीपेची तेथें आवश्यकता काय हें मला नीट समजत नाहीं. तथापि डॉ. बार्नेट यांच्या मताचा अंदाज करण्यास तें एक साधन आहे. तेही ' About this time Puligere was under the rule of Arikesarin II ' असें म्हणत आहेत. वर उद्धृत केलेल्या या वचनांवरून वरील विद्वानांच्या मतें हें चालुक्य कुल किंवा त्यांतील एक पुरुष लक्ष्मेश्वरच्या बाजूस होता असें ठरूं पाहतें. पण या मतावर माझे पुढील आक्षेप आहेत. या कुलाचा एकही लेख अजून कर्नाटकाच्या बाजूस सांपडलेला दिसत नाहीं. श्री. जोशी यांस मिळालेला ताम्रपट परभणीस म्हणजे तेलंगणाजवळ मिळाला. पंपाचा आश्रयदाता जो अरिकेसरिन् त्याचा, त्याच्या युद्ध मंत्र्याचा व राजधानीचा उल्लेख करणारा वेमुलवाडा लेख तेलंगणात मिळाला. कोल्लिपारा दानपत्रही तेलंगणांतच मिळालें. या सर्वांत आलेलीं व दान दिलेलीं गावें आणि उल्लेखिलेल्या गोष्टी तेलंगणांतच घडल्याचें दिसतें. उलट लक्ष्मेश्वरवर या २००।३०० वर्षांच्या काळांत या कुलांतील पुरुषांहून भिन्न व्यक्तींचा अंमल असलेला दिसतो. उदाहरणार्थ श. ७८७

---

१ ' बिब्लिओथिका कर्नाटिका ' मालेमधील राइस संपादित पंप भारत किंवा विक्रमार्जुनविजय,, बंगलोर, इ. १८९८ प्रस्तावना पृ. १

२ बॉंबे गॅझिटिअर व्हॉ. १ भाग २ पृ. ३८१

३ रा. नरसिंहाचार्य कृत ' कर्नाटक कविचरिते भाग १ पृ ३०–३१

४ Epi. Ind. १३, ३२८,

पार्थिव संवत्सर या वर्षी पुलिगेरेवर कुप्पेय नावाच्या गृहस्थाचा अंमल होता.[१] पाहिल्या अमोघवर्षाच्या ६१ व्या वर्षी म्हणजे श. ७९७ या वर्षी पुलिगेरेवर बंकेयरस नावाच्या गृहस्थाचा अधिकार चालत होता.[२] श. ८३८ मध्यें महासामंत लेंडेयरस याचा अंमल लक्ष्मेश्वरावर होता.[३] श. ८५१ च्या एका लेखांत पुलिगेरेचा उल्लेख आहे.पण त्या लेखांत कोणा सामंताचा अंमल असल्याचा निर्देश नसून फक्त रेवदास दिक्षीत व वीशोत्तर दिक्षीत या दोन गृहस्थांचीं नांवें आलीं आहेत; पण ते पुलिगेरेवरचे अधिकारी होते असें सांगितलेलें नाहीं.[४] धारवाड जिल्ह्यांतील हेब्बाळ गावच्या एका लेखांत सत्यवाक्य कोंगुणिवर्म पेर्मनडि भूतुग यानें राष्ट्रकूट अमोघवर्ष वड्डिग याच्या मुलीशीं लग्न केल्यामुळें त्यास पुलिगेरे, बेळवोल, किसुकाड, बागडगे हे देश आंदण मिळाल्याचें सांगितलें आहे.[५] म्हैसूर सस्थानांतील आतकूर येथील श. ८७२ च्या लेखांत भूतुगानें राजादित्य चोल यास मारल्यामुळें राष्ट्रकूट तिसरा कृष्ण यानें त्यास बनवासी, बेळवोल, पुलिगेरे, किसुकाड, बागेनाड हे देश दिल्याचें सांगितलें आहे.[६] हेब्बाळ येथील लेखांत सांगितलेली गोष्ट श. ८३३ ते ८६२ च्या दर्म्यान केव्हां तरी झाली असें डॉ. फ्लीट यांचें मत आहे.[५] श. ८९० च्या लक्ष्मेश्वर येथील लेखांत वरील भूतुगाचा मुलगा मारसिंह यानें एका देवालयास दान दिल्याचें सांगितलें आहे.[७] धारवाड जिल्ह्यांतील अदरगुंची व गुंडूर येथील श. ८९३ व ८९५ च्या लेखांत मारसिंह पुलिगेरे व इतर प्रदेश यांवर राज्य करीत असल्याचें सांगितलें आहे.[७] ज्यास या पुढील कालांतील पुलिगेरेवरील अधिकारी पाहिजे असतील त्यानें Epi Ind. Vol XX No. III या पुस्तकाचीं ६५ व ६६ हीं पानें पहावीं. मला त्यांशीं सध्यां कर्तव्य नसल्यानें मी ते येथें देत नाहीं. यावरून दिसून येईल कीं, श. ८६३ च्या पुढें मागें उपर्युक्त चालुक्य कुलाचा पुलिगेरेवर अंमल

---

१ Epi. Ind. ७, २०१, २ Epi. Ind. ७, २१३

३ बॉंबे गॅझिटियर व्हॉ. १ भाग २ पृ. ४१६

४ टीप १३ पहा.

५ बॉंबे गॅझिटियर व्हॉ. १ भाग २ पृ. ३०४, ३०५, ४१८,

६ सदर पृ. ४१९, ४२१,

७ सदर पृ. ३०६

असल्याचा उल्लेख मला सांपडला नाहीं· एकाद्या प्रकाशित वा अप्रकाशित लेखांत असल्यास तो मला कळविण्याची वाचकांनीं कृपा करावी.

डॉ· फ्लीट यांनीं धर्मऊरु म्हणजे डंबळ असें जें सांगितलें आहे तें बरोबर आहे कीं नाहीं हें निश्चित करणें कठीण आहे; कारण धर्मऊरु हें ज्या **बच्चेसहस्र** नावाच्या देशांत होतें म्हणून सांगितलें आहे त्या देशाचें नाव एका लेखांत बेळवलनाडच्या संगतीनें आलें आहे. तरी पण त्याची कर्नाटकांत कोठपासून कोठपर्यंत व्याप्ति होती हें आज निश्चित करण्यास साधन नाहीं.[1] हेंही सांगणें आवश्यक आहे कीं, प्रकाशित झालेल्या कोणत्याही कर्नाटकांतील लेखांत या देशाचा उल्लेख मला सांपडला नाहीं. उलट डंबळ ज्या देशभागांत होतें त्याचें नाव **मासवाडी** असें असून त्यांत फक्त १४० गावांचाच समावेश होत होता असें सांगितलेलें दिसतें.[2]

वेमुलवाडा लेखाच्या संपादकांनीं पंपानें ‘ जोळद् पाळि ’ असा जो शब्द वापरला आहे त्यावरून डॉ. फ्लीट व मि. राइस यांप्रमाणेंच

---

१ **निजामच्या** राज्यातील **रायचूर** जिल्ह्यापैकी **कोप्पळ** गावापाशी असलेल्या कुकनूर या गावीं शक १०८६ सुभानू संवत्सर या वर्षीचा एक अप्रकाशित लेख असून त्यात ‘ **बेळवल**नाड **वत्सेय**नाडधिकारि महाप्रधान दंडनायक अम्मणय्यंगळुं ’ असा उल्लेख असल्याचें माझे मित्र श्री. **पां. भि. देसाई** हे कळवितात. या उल्लेखांतील ‘ वत्सेय ’ या शब्दाचें **बच्चे** असें रूप होऊं शकेल. तसेंच ‘ बेळ्वलनाड ’ व ‘ वत्सेयनाड ’ याच्या जोड उल्लेखावरून ‘ वत्सेयनाड ’ बेळ्वलनाडच्या जवळ असणें शक्य आहे. बेळ्वल व पुलिगेरे याच्या जोड उल्लेखांच्या विपुलतेमुळें हे तिन्ही प्रांत जवळ जवळ संभवतात. पण पुलिगेरे व बेळ्वल हे प्रत्येकीं तीनशेचे देश होते. व बच्चे १००० चा देश होता. तसेंच **प्रो. गोकाक** ( फर्ग्यूसन कॉलेज, पुणें ) यांचे मताप्रमाणें पुलिगेरे जवळचें धर्मपूर हेंच पंपास बक्षीस मिळालेलें धर्मऊरु गाव होय असें धरलें तर पुलिगेरे तीनशेच्या इतक्या जवळ बच्चे सहस्र सुरू होत असे असें समजावें लागेल. हें धर्मपूर गाव हल्लीं ओसाड आहे, पण ६०।७० वर्षांपूर्वी त्यांत वस्ती होती असें प्रो. गोकाक सांगतात.

२ बॉंबे गॅझिटियर व्हॉ. १ भाग २ पृ. ४६५ पृ. ४३५. ज्या लेखांवरून मी वरील विधान केलें आहे ते लेख श. ८०० ते ९०० च्या दरम्यानचे नसून नंतरचे आहेत हें खरें. पण मला डंबळ व मासवाडी यांचे उल्लेख असलेले तत्कालीन लेख मिळाले नाहींत म्हणून मागाहूनचे घेतले आहेत.

हें कुल जोळ प्रांतावर राज्य करीत होतें हें खरें धरून जोळ प्रांत हल्लीच्या पानगलच्या बाजूचा प्रदेश आहे असें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. पण या शब्दाचा खरा अर्थ ऋण स्मरणारा, खाल्ले अन्नास जागणारा असा होतो हें श्री. नरसिंहाचार्य यांनीं याच शब्दाचे रन्न, कर्णपार्य, व कुमारव्यास या कवींनीं जे प्रयोग केले आहेत त्यांवरून दाखवून दिलें आहे. ( कर्नाटक कविचरिते भाग १ पृ. ३१ टीप) तेव्हां जोळद् पाळि हे शब्द या कुळाचा अधिकारप्रदेश ठरविण्यास निरुपयोगी आहेत. मला वाटतें वेमुलवाडा या राजधानीच्या आसमंतात बराच मोठा भाग या कुळाच्या अधिकाराखालीं असावा. तसेंच धर्मऊरु खरोखरच लक्ष्मेश्वर जवळ आहे असें समजलें तरी लक्ष्मेश्वरकडे कांहीं थोड्या वतनी मुलखाशिवाय जास्त प्रदेश या कुलाच्या ताब्यांत नसावा. एरवीं या कुलाचा एकादा तरी लेख लक्ष्मेश्वरकडे सांपडता.

येणेंप्रमाणें पूर्वीच्या मताला कोणताच आधार नाहीं हें दाखविलें. आतां मला या ताम्रपटाच्या साहाय्यानें असें म्हणावयाचें आहे कीं हें चालुक्यकुल कर्नाटकांत रहात नसून तेलंगणांत रहात असावें. याचीं कारणें:— ( १ )या व इतर लेखांत जीं गावें आलीं आहेत तीं व दान दिलेलीं गावें हीं तेलंगणांत आहेत. तेलंगणांत या कुलांतील पुरुषांचा (विशेषतः २ रा अरिकेसरिन् याचा) अधिकार असल्याशिवाय ते त्यांतील गाव दान करूं शकणार नाहींत. ( २ ) याच ताम्रपटांत २ ऱ्या अरिकेसरिन्‌ची राजधानी [ लें ] बुळपाटक या नावानें उल्लेखिलेली असून हें गावही दान दिलेल्या गावांजवळच आहे. म्हणजे २ ऱ्या अरिकेसरिन्‌ची राजधानीही तेलंगणांतच होती. ( ३ ) या कुलाचा मूळ पुरुष युद्धमल्ल हा तिन्ही कलिंगांसह वेंगीचें रक्षण करीत असे.[1] हें कुल जर लक्ष्मेश्वरकडे होतें असें मानलें तर तेथून वेंगी व तीन कलिंग यांचें रक्षण होणें शक्य दिसत नाहीं. कारण वेंगी व तीन कलिंग आणि लक्ष्मेश्वर यांमध्यें फार मोठें अंतर आहे. सुधारलेल्या दळणवळणाच्या साधनांच्या अभावीं एकाद्या सामंतास कायमचे लक्ष्मेश्वराहून वरील प्रांतांचें रक्षण करणें अशक्य आहे. अर्थात् या कुलाचा अधिकारप्रदेश तेलंगणांतच असावा. मधल्या पुरुषांच्याविषयीं जरी विशेष माहिती मिळत नसली तरी मधले पुरुष तेलंगणांतच झाले असावेत.

---

१ यास आधार ताम्रपटांतील पुढील वाक्य 'सकलिंगत्रयां वेंगिं यो बति स्म पराक्रमात्

पहिला आणि शेवटचे दोन हे तर खात्रीनें होतेच. निदान मधले पुरुष लक्ष्मेश्वरकडे होते असें म्हणण्यास मुळींच आधार नाहीं.

या माझ्या विधानांवर दोन आक्षेप येण्यासारखे असून त्यांचें निराकरण मी करूं शकेन असें वाटतें. त्यांपैकीं पहिला आक्षेप असा कीं, सोमदेव-सूरीनें आपल्या पुस्तकांत ३ रा अरिकेसरिन् याचा बाप बद्यग याची राजधानी **गंगधारा** अशी सांगितली आहे त्याची वाट काय ? माझें यावर म्हणणें असें: हल्लीं निर्णयसागरी यशस्तिलकचंपूची जी प्रत आहे तींत अनेक चुकीचे पाठ आहेत. तसेंच मी चंपूचीं जीं हस्तलिखितें पाहिलीं त्यांत अनेक पाठभेद असून कित्येक अगदींच अक्षम्य आहेत. उदाहरणार्थ, सोमदेवसूरीनें उल्लेखिलेल्या बद्यग, गंगाधारा व मेल्पाटी या नावांपैकीं बद्यग किंवा बद्दिग याबद्दल **वद्यगराज**, **वागराज**, आणि **वाद्यराज्य** असे पाठ सांपडतात. गंगाधारा या शद्बांचे गंगाधरा, गंगधारा, मेल्पाटीबद्दल मल्पाटी, मल्याटी व मेल्याटी असे पाठ सांपडतात.[1] थोडक्यांत सांगावयाचें

१ **गंगधारा** हें गाव कोठें सांपडत नाहीं: मेल्पाटी हे गाव मात्र हल्लीं मेल्पाडि या स्वरूपांत उपलब्ध आहे. शिवाय मेल्पाडि या गावाचा मेल्पाटी या स्वरूपांत कऱ्हाड ताम्रपटात उल्लेख आला आहे ( Ep. Ind. IV, 281. ) हा ताम्रपट श. ८८० फाल्गुन वद्य १३ चा असून त्यावेळी दान देणारा राजा राष्ट्रकूट ३ रा कृष्णराज याचा मुक्काम मेल्पाटी येथें होता. सोमदेवसूरि हाच कृष्ण-राज श. ८८१ चैत्र शुद्ध १३ ला मेल्पाटी येथें होता असें सागतों. अर्थात् दोन्ही उल्लेख एकमेकांशी जुळते आहेत. पंडित नाथूरामजी प्रेमी यांनी सोमदेवसूरीचा नीति-वाक्यामृत ग्रंथ प्रसिद्ध करीत असतां त्याच्या प्रस्तावनेंत याची माहिती देत अस-तांना कदाचित् मालखेड व मेल्पाटी ही दोन्ही गावें एक असावीत असें जें म्हटलें आहे तें अर्थात् बरोबर नाही ( पहा जैन–साहित्य संशोधक खंड २ अंक १ पृ. ४६ ) कऱ्हाड ताम्रपटाचे संपादन करीत असतां **श्री. कै. डॉ. भांडारकर** यांनीं लिहिलें आहे कीं, मेल्पाटी म्हणजे उत्तर अर्काट जिल्ह्यातील चितूर तालुक्यांतील असलें मेल्पाडि हें गाव असलें पाहिजे( Epi.Ind.IV 281 ). **डॉ. ह्यूल्श** म्हणतात कीं, मेल्पाडि हें गाव उत्तर अर्काट जिल्ह्यांतील गुडियातम तालुक्यांत आहे ( Epi. .Ind.IV 140 ). आणि ‘ इन्स्क्रिपशन्स ऑफ दि मद्रास प्रेसिडेन्सी ’ या ग्रंथांत हा गाव उत्तर अर्काट जिल्ह्यांतील वांदिवाश तालुक्यांत घातला असून त्या गावाची माहिती देताना कऱ्हाड ताम्रपटांतील मेल्पाटी व मेल्पाडि हीं दोन्ही नांवें एकच असें सांगितलें आहे ( पृ. ११५ ). या तीन उल्लेखांपैकीं शेवटचा उल्लेख जास्त प्रमाणभूत मानला पाहिजे.

म्हणजे या तिन्ही विशेषनामांबद्दल छापील व हस्तलिखित पुस्तकांतून अतिशयच घोटाळा आहे. यामुळें गंगधारा हें नांव तरी बरोबर आहे कीं नाहीं हें समजत नाहीं. शिवाय यशास्तिलकांतील उल्लेखावरून वरील गंगधारा, हें गाव कर्नाटकांत होतें असें कोणी दाखवूं शकत नाहीं. उलट राष्ट्रकूट ३ रा कृष्ण मेल्पाडीच्या बाजूस कशासाठीं गेला होता याचा जर विचार केला तर असें वाटतें कीं, वरील गांव मेल्पाडीच्या आसपास ५।२५ कोसांत असावें व तेथें बद्यगाचा कांहीं काल वास झाला असावा.[1] दुसरा आक्षेप असा कीं, हें कुल जर तेलंगणांत होतें व पंप मूळचा वेंगीकडील होता तर त्यानें आपला ग्रंथ कानडींत कां रचावा? याला असें उत्तर देतां येईल कीं, या वेळीं कानडीस मोठें महत्त्व आलेलें असल्यामुळें मोठे ग्रंथकार कानडींत रचना करीत. श. ९१२ च्या सुमारास झालेला नागवर्म नावाचा कवी वेंगीकडून आलेला असून त्यानेंही कानडीमध्यें ग्रंथरचना केल्याचें प्रसिद्ध आहे. उलट संस्कृत ही मान्य भाषा असल्यानें याच चालुक्य कुलाचा आश्रित अशा सोमदेवसूरीनें आपली रचना संस्कृतमध्यें केली आहे हेंही ध्यानांत ठेवलें पाहिजे. तसेंच या चालुक्य कुलाची मातृभाषाही कानडी असेल व यामुळें आश्रितानें कानडींत रचना केली आहे.

या ताम्रपटांत सोमदेवसूरीविषयीं जी माहिती आली आहे तीही अशीच वाद उत्पन्न करणारी आहे. यशस्तिलकाच्या शेवटीं सोमदेवानें आपली गुरुपरंपरा पुढील प्रमाणें दिली आहे. देवसंघ → यशोदेव → नेमिदेव →सोमदेव. या परंपरेवरून व प्रत्येक आचार्याच्या नावाच्या शेवटीं देव हें पद असल्यानें हे सर्व आचार्य देवसंघांत मोडत होते हें उघड आहे.[2]

---

१ Epi. Ind. IV 281 'दक्षिणदि[ ङ्म ]ण्डलानि भृत्ये[ भ्यो ] जीवनं कर्तुं मडे( मण्ड )लेश्वरसर्व्वस्वानि प्रतिगृहीतुं कालप्रियगण्डमार्तण्डकृष्णेश्वरायतनानि निष्पादयितु मेलपाटीसमावासित श्रीमद्विजयकटकेन मया'

२ **पी. पीटर्सन** यांनी मुंबई सर्कलमधील संस्कृत पुस्तकांच्या शोधाविषयीच्या ४ थ्या अहवालात यशोदेवाचा गुरू देवसंघतिलक नावाचा होता असें सांगितलें आहे तें बरोबर दिसत नाहीं. यशस्तिलकाच्या शेवटी कवीनें स्वतःविषयीं माहिती देताना प्रथमच 'श्रीमानस्ति स देवसंघतिलको देवो यशःपूर्वकः' असें म्हटलें आहे. येथें देवसंघतिलक हा सामासिक शब्द देव शब्दाचें विशेषण आहे हें उघड आहे.

**पण प्रस्तुत ताम्रपटांत** वरील गुरुपरंपरा असून संघाचें नाव मात्र गौड असें दिलें आहे. तेव्हां या दोन्ही नावांचा मेळ कसा घालावयाचा हा प्रश्न उत्पन्न झाला आहे. सोमदेवाची माहिती देत असतां ताम्रपटांत 'अपि च यो भगवानादर्श स्समस्तविद्यानां विरचायिता यशोधरचरितस्य कर्त्ता स्याद्वादोपनिषदः कवि (व) [*यि] ता चान्येषामपि सुभाषितानां' असे शब्द घातलेले आहेत. यापैकीं यशोधरचरित म्हणजेच यशस्तिलक असल्यामुळें या माहितीविषयीं वाद नाहीं. स्याद्वादोपनिषद् नावाचा ग्रंथ मात्र सोमदेवानें केला आहे कीं नाहीं हें निश्चित समजत नाहीं. विक्रमसंवत् १९६५ च्या श्वेतांबर जैन परिषदेनें **जैन ग्रंथावली** नावाची एक जैन ग्रंथांची सूची प्रसिद्ध केली आहे. तींत सोमदेवाच्या नावावर ६ ग्रंथ दिले आहेत. त्या ग्रंथांत वरील उपनिषदाचें नाव नाहीं. श्रीयुत नाथूरामजी प्रेमी सोमदेवानें ५ ग्रंथ केले असें म्हणतात.[1] त्यांतही हें उपनिषद् नाहीं. तेव्हां आज या सोमदेवानें केलेलें स्याद्वादोपनिषद् लुप्त झालें आहे असें म्हणावयाचें काय? स्याद्वादोपनिषदाप्रमाणें सोमदेवानें केलेलीं सुभाषितेंही आज उपलब्ध नाहींत. युक्तिचिंतामणि किंवा नीतिवाक्यामृत या त्यानें केलेल्या ग्रंथांच्या नावावरून कोणास वाटेल कीं यांपैकीं एकादा ग्रंथ सुभाषितांचा असावा. पण पहिला ग्रंथ तर्कपर[2] तर दुसरा राजनीतिशास्त्रपर आहे.[3] हीं सुभाषितेंही लुप्त झाली असें समजावयाचें काय? जैन ग्रंथावलींत सोमेश्वरदेवाच्या नावावर सुभाषितावली नावाचा एक ग्रंथ दिला आहे. पण सोमदेव व सोमेश्वरदेव हे एक कसें समजावयाचें. ?

---

## ताम्रपटाचें वाचन*

### १ ला पत्रा २ री बाजू.

( १ ) ओं[1] जयति[2] जगति जैनं शासनं धर्म्मचक्र[3]क्रमविदळितैनश्चक्रवाळं नमस्यम्[॥*]

---

१ जैन साहित्यसंशोधक खंड २ अंक १ पृ. ४३ २ किंवा

३ नीतिवाक्यामृताच्या समाप्तिसंकल्पात ' इति......श्रीमत्सोमदेवसूरिणा विरचितं नीतिवाक्यामृतं नाम राजनीतिशास्त्रं समाप्तं ' असे शब्द आहेत.

* मूळ ताम्रपटावरून.

१ ओं चिन्हानें दाखविला आहे. २ मालिनी. ३ हें जैनधर्माची खूण आहे.

# चालुक्य अरिकेसरिन् याचा परभणी ताम्रपट श. ८८८

# Parbhani plates of Chalukya Arikesarin S'. 888



१/४ B. I. S M. Collection of copper-plates No. 9. Scale 1/4



B. I. S. M. Collection of copper-plates No. 9. Scale 1/4.

( २ ) त्रिजगदधिपवंद्यं मन्दिरं मंगळानां दधदधिकमनोज्ञं पंचकल्याण लक्ष्मीम्¹ [ ।।१।।* ]

( ३ ) अस्त्यादित्यभवो वंशश्चाळुक्य इति विश्रुतः । तत्राभूद्युद्धमल्लाख्यो नृपतिर्व्विक्रमार्ण्णवः ।। [ २।।* ] सपा²

( ४ ) दलक्षभूभर्त्ता तैळत्राप्यां सपोदने । अवगाहोत्सवं चक्रे शक्रश्रीर्म्मद दन्तिनाम् ।। [ ३।।* ] सकळिंगत्रयां वेंगिं

( ५ ) योवति स्म पराक्रमात् [ ।* ] पुत्रो जयश्रियः पात्रन्तस्यासीदरि केसरी ।। [ ४।।* ] नरसिंहो भद्रदेवस्तेजः³कान्ति

( ६ ) निधी स्वयं । तस्याभूतां सुतो(तौ) साक्षात्सूर्य्याचन्द्रमसाविव।।[५।।*] तत्राभून्नरसिंहस्य

( ७ ) युद्धमल्लस्तनूभवः । वन्दिचिन्तामणिस्तस्य बद्दिगोजनि नन्दनः।। [६।।*] नानादुर्द्धरयु

( ८ ) द्धलब्धविजयश्रीसंगमाकर्ण्णनाद्भीमः पाण्डव एष इत्यसुहृदो य

( ९ ) स्मात्पर बिभ्यति । [।*] भीमं भीमपराक्रमैकनिळयन्त हेळयैवाग्रहीदुग्रं

(१०) ग्राहमिवान्तरंबुसमरे दोर्व्विक्रमाद्बद्दिगः ।। [७।।*] औदार्य्यनिर्ज्जित-सुरद्रुमकामधेनो

(११) र्द्दोर्व्विक्रमक्रमतिरस्कृतकार्त्तवीर्य्यात् । [।*] तस्मादजायत सुतः⁴ कमनीयकीर्त्तिः श्रीयुद्ध

---

( मागील टीपेवरून चालू )

जेव्हां एकादा तीर्थंकर धर्मप्रचारास निघतो तेव्हा हें त्याच्या पुढें चालत असतें अशी समजूत आहे. तसेच हें चक्र जैन धर्म श्रेष्ठ आहे असें दाखवितें. हे पवित्र हेतू दाखविण्यासाठी जैन लेख व शिल्प यावर काढतात. १ पाच कल्याणे पुढीलप्रमाणें– गर्भकल्याण, जन्मकल्याण, तपःकल्याण, ज्ञानकल्याण, निर्वाणकल्याण. २ अनुष्टुभ्. ३ शार्दूलविक्रीडित. ४ वसंततिलक.

(१२) मल्लनृपतिः प्रथितप्रतापः ॥ [ ८॥* ] कुर्व्वन्निवात्र निजनाम यथार्त्थमुच्चैराविर्भवद्भुजपरा

(१३) क्रमडंबरेण । [।* ] शातासितीव्रनखराग्रविदारितारिवक्षस्थळो जनि ततो नरसिंहराजः । [ । ९॥*]

(१४) मोंद्यद्दुर्द्दरवैरिवारणशिरःकुट्टाकदोःशाळिनः सिंहस्येव स केसरीह नरसिंहे

२ रा पत्रा १ ली बाजू

(१५) स्य स्फुरद्विक्रमः । [ ।*] तस्यासीदरिकेसरीति तनयो (यः) शून्यं कृतं शैशवं येनोद्यत्क्षितिभृत्प्रभा

(१६) नकटकाक्रान्तिक्रमाक्रीडया ॥ [ १०॥*] आर्य्यच्छत्रयुगं हिमांशुविशदं हैमारविन्दांकितं मायूरा

(१७) तपवारणं च ककुदं यद्यौवराज्यश्रियः । [ ।* ] अग्रे धावति यस्य सम्प्रति स किं वर्ण्येत वीराग्र

(१८) णीर्द्दुर्व्वारोरुपराक्रमो गुणमणिः सामन्तचूडामणिः । [। ११॥* ] राष्ट्रकूटकुळे ख्याते जाता लोकां

(१९) बिका सती । वीरश्रीरिव वीरस्य तस्यासीत्सुदती प्रिया ॥ [ १२॥* ] भद्रदेव इति नन्दनस्तयोः शक्तिमान्स

(२०) विनयस्सदक्षिणः [ ॥* ] शैळराजतनयात्रिनेत्रयोः कार्त्तिकेय इव कीर्त्तिमानभूत् ॥ [ १३ ॥* ] तस्माद

(२१) जनि तेजस्वी राजा नाम्नारिकेसरी । आनन्द चन्द्रवच्चक्रे कान्त्या कुवळयस्य यः ॥ [ १४॥* ]

---

१ वसंततिलक. २ शार्दूलविक्रीडित ३ येथें यतिभंग दोष दिसतो. ४ या पुढील अक्षरांविषयीं शंका आहे. ५ अनुष्टुभ्. ६ रथोद्धता.

(२२) श्री गौडसंघे मुनिमान्यकीर्त्तिर्न्नाम्ना यशोदेव इति प्रजज्ञे । [ ।* ] बभूव यस्योग्र

(२३) तपःप्रभावात्समागमः शासनदेवताभिः । [ । १५॥* ] शिष्योभवत्तस्य महर्द्धिभाजः स्याद्वा

(२४) दरत्नाकरपारदृश्वा । [ ।* ] श्रीनेमिदेवः परवादिदर्प्पद्रुमावळीच्छेदकुठारनेमिः ॥ [ १६॥* ] तस्मात्तपःश्रि

(२५) यो भर्त्ता(र्त्तुः)ल्लो(र्लो)कानां हृदयंगमाः । बभूवुर्बहवः शिष्या रत्नानीव तदाकरात् ॥ [ १७॥* ] तेषां शतस्यावरजः

(२६) शतस्य तथाभवत्पूर्व्वज एव धीमान् । [ ।* ] श्रीसोमदेवस्तपसः श्रुतस्य स्थानं यशोधा

(२७) म गुणोर्ज्जितश्रीः ॥ [१८॥* ] अपि च यो भगवानादर्शस्समस्तविद्यानां विरचयिता यशोधरच

(२८) रितस्य कर्त्ता स्याद्वादोपानिषदःकवि(व)[यि*] ता चान्येषामपि सुभाषितानामखिळमहासाम

**२ रा पत्रा १ री बाजू**

(२९) [ न्तसी ]मन्तप्रान्तपर्य्यस्तोत्तंसस्रक्सुरभिचरणस्सकळविद्वज्जनकर्ण्णावतंसीभवद्यशःपु

(३०) ण्डरीकः सूर्य्य इव सकळावनिभृतां शिरःश्रेणिषु शिखण्डमण्डनाय मानपादपद्मोभू

(३१) त् ॥ स्वस्त्यकाळवर्षदेवश्रीपृथिविवल्लभमहाराजाधिराजपरमेश्वरपरमभट्टारकश्रीम

(३२) दमोघवर्षदेवपादानुध्यातप्रवर्द्धमानविजयराज्यश्रीकृष्णराजदेवपादपद्मो

---

१ इंद्रवज्रा. २ हा शब्द **गोद** असाही वाचतां येईल. ३ प्रत्येक जैन तीर्थंकरास शासन देवता सांगितल्या असून त्या जरूरीच्या वेळी त्यास मदत करतात अशी समजूत आहे. ४ अनुष्टुभ्.

(३३) पञ्जीविना ॥ स्वस्ति समधिगतपंञ्चमहाशब्दमहासामन्ताधिपतिसमस्तभुव
(३४) नसंस्तूयमानचाळुक्यवंशोद्भवर्षाम्बरांकुशाम्मनगन्धवारणगन्धेभविद्याध
(३५) रप्रियगल्लत्रिभुवनमल्लोदात्तनारायणप्रत्यक्षवाद्गुळिविक्रमार्ज्जुन
(३६) गुणनिधिगुणार्ण्णवसामन्तचूडामणिप्रमुखानेकप्रशास्तिविजयांकमा
(३७) ळिकाळंकृतेन [ळें]बुळपाटकनामधेयनिजराजधान्यां निजपितुः श्री मद्भग्गस्य शुभधाम
(३८) जिनालयाख्यवस[तेः] खण्डस्फुटितनवसुधाकर्म्मबाळिनिवेद्यार्त्थं शकाब्दे ष्वष्टाशीत्य
(३९) धिके ष्वष्टशतेषु गतेषु [प्रव]र्त्तमानक्षयसंवत्सरवैशाखपो(पौ) र्ण्णमास्या (स्यां) बुधवारे तेन
(४०) श्रीमदरिकेसरिणा अनन्तरोक्तार्ये तस्मै श्रीमत्सोमदेवसूरये सब्बिदेशासहस्त्रान्त
(४१) र्गतरेपाकद्वादशग्रामीमध्ये कुत्तुंवृत्ति वनिकटुपुलुनामा ग्रामः त्रिभो गाभ्यन्तर

### २ रा पत्रा १ ली बाजू

(४२) सिद्धिसर्व्वनमस्यस्सोदकधारन्दत्तः ॥ तस्य पूर्व्वतः दरियूरु । दक्षिणतः इळिन्दिकुंट ।
(४३) पश्चिमतः वेल्लाळपट्टु । उत्तरतः कट्टाकूरु । एवं चतुराघाटघटित भूमिरवातसू
(४४) र्योत्तरीयः ॥ सामान्योयन्धर्म्मसेतुर्न्नृपाणां काळे काळे पाळनीयो भवद्भिः । सर्व्वा
(४५) नेतान्भावि[नः] पार्त्थिवेन्द्रान्भूयो भूयो याचते रामचन्द्रः ॥ [१९॥*] बहुभिर्व्वसुधा

---

१ अर्थाच्या दृष्टीनें हा शब्द नीट लागत नाही. २ पूर्वोत्तराय पाहिजे. ३ या शब्दाचा अर्थ कळत नाहीं. पहा Epi. Ind. १६, ८१. ४ शालिनी ५ अनुष्टुभ्.

(४६) दत्ता राजभिस्सगरा[ दिभिः ] । यस्य यस्य यदा भूमिस्तस्य तस्य तदा फळम् ॥ [२०॥*] मद्दं

(४७) शजाः परमहीपतिवंशजा वा पापादपेतमनसो [भु]वि भाविभूपाः[ ॥* ]

(४८) ये पाळयन्ति मम धर्म्ममिमं समस्तं तेषां मया विरचितोंजाळि

(४९) रेष मूर्ध्नि ॥[२१॥*] स्वेदत्तां परदत्तां वा यो हरेत वसुन्धराम् । षष्टिर्व्वर्ष

(५०) सहस्राणि विष्ठायां जायते कृमिः ॥ [ २२॥* ] अरिकेसरिणा दत्तं कथितं कविपेद्दणेन

(५१) भट्टेन । शासनमिदमुत्कीर्ण्णं शुभधामजिनाळयस्य रेवेण ॥

**भाषांतर.**

ओं, जगांत आपल्या करवतीनें ज्यानें पापाचा नाश केला आहे असें, वर्तुलाकार, नमस्य, त्रिजगांतील राजांना वंद्य, मंगलांचें घर, अधिक सौंदर्य व पंचकल्याणरूपी लक्ष्मी धारण करणाऱ्या धर्मचक्र या जैनशासनाचा जय आहे ( १ ). चालुक्य नावाचा एक प्रख्यात सूर्यवंश आहे. त्यांत शौर्याचा समुद्र असा युद्धमल्ल नावाचा राजा झाला ( २ ). सव्वा लक्ष प्रदेशावर राज्य करणाऱ्या व इंद्राचें ऐश्वर्य असलेल्या त्यानें मत्त हत्तींना तेलाच्या विहिरींत स्नान घालण्याचा उत्सव केला ( ३ ). ज्यानें पराक्रमानें कलिंगत्रयासह वेंगीचें रक्षण केलें अशा त्याचा जय व ऐश्वर्य यांचें स्थान असलेला अरिकेसरिन् हा मुलगा होता ( ४ ). त्याला नरसिंह व भद्रदेव नावाचे साक्षात् चंद्रसूर्याप्रमाणें तेज व कांती यांचे साठे असे दोन मुलगे होते (५). पैकीं नरसिंहाला युद्धमल्ल मुलगा झाला. भाटांना चिंतामणि अशा त्याला बद्दिग मुलगा झाला (६). निरनिराळ्या दुर्धर युद्धांत विजय व ऐश्वर्य मिळविलेल्या संगमाचा वेध करण्यामुळें हा पांडव भीम आहे असें समजून ज्याला शत्रू अतिशय भितात अशा, प्रचंड पराक्रमाचें एकच घर असलेल्या भीमास बद्दिगानें बाहुबलावर, क्रूर मकराप्रमाणें, पाण्यांतील युद्धांत ताबडतोब पकडलें ( ७ ). ज्यानें औदार्यानें कल्पतरु व कामधेनू यांना जिंकिलें व बाहूंच्या पराक्रमांच्या पंक्तीनें कार्तवीर्यास तिरस्कृत

१ वसंततिलक. २ अनुष्टुभ्.

केलें अशा त्याला ज्याची कीर्ती आकर्षक व प्रताप प्रख्यात आहे असा युद्धमल्ल नावाचा राजा मुलगा झाला ( ८ ). त्यापासून येथें जोरानें प्रकट होणाऱ्या बाहूंच्या पराक्रमांच्या समूहानें जणूं आपलें नांव सार्थ करणारा व धार लावलेल्या तरवारीप्रमाणें तीव्र अशा नखाग्रांनीं ज्यानें शत्रूंचीं वक्षस्थळें फाडलीं आहेत असा नरसिंहराज झाला ( ९ ). माजणाऱ्या व दुर्धर अशा शत्रुरूपी हत्तींची डोकीं फोडणारे हात असलेल्या नरसिंहाचा पराक्रम सिंहाप्रमाणें प्रकट असून तो येथें जणूं सिंह आहे. त्याला अरिकेसरिन् म्हणून मुलगा होता. यानें सज्ज असणाऱ्या राजांच्या मुख्य सैन्यांवर हल्ले करण्याच्या क्रमाचा खेळ सुरूं करून बालपण शून्यवत् केलें (१०). श्वेत कमलांनीं अंकित व चंद्राप्रमाणें शुभ्र असें श्रेष्ठ छत्रद्वय, तसेंच यौवराज्याच्या ऐश्वर्याचें राजचिन्ह अशी जी मोराची अब्दागिरी हीं ज्याच्या पुढें धावतात त्या वीराग्रणी, बहुपराक्रमी, गुणमणि व सामंतमुख्याचें काय वर्णन करतां येईल ? [ नाहीं हा भाव ] ( ११ ). प्रसिद्ध राष्ट्रकूट कुळांत उत्पन्न झालेली, चांगल्या दातांची, सती, लोकांबिका वीराच्या वीरश्रीप्रमाणें त्याची बायको होती ( १२ ). भद्रदेव नावाचा त्यांचा मुलगा, शक्तिमान, विनयी, शाहाणा आणि शंकरपार्वतीच्या कार्तिके याप्रमाणें कीर्तिमान होता ( १३ ). त्यापासून अरिकेसरिन् नावाचा तेजस्वी राजा झाला. यानें (आपल्या) तेजानें चंद्राप्रमाणें कुवलयां(कमलां) ना आनंद दिला ( १४ ). श्रीगौड संघामध्यें ऋषींना ज्याची कीर्ति मान्य आहे असा यशोदेव झाला. याच्या उग्रतपाच्या सामर्थ्यामुळें याची शासनदेवतांशीं भेट झाली होती ( १५ ). त्या महानुभावाचा शिष्य नेमिदेव स्याद्वादरूपी समुद्राचा पैलतीर पाहणारा व प्रतिस्पर्ध्यांच्या गर्वरूपी वृक्षपंक्तींना छेदण्यांत कुऱ्हाड होता ( १६ ). तपरूपी लक्ष्मीचा पति अशा त्यापासून लोकांना आनंद देणारे असे शिष्य खाणींतील रत्नाप्रमाणें पुष्कळ झाले ( १७ ). त्यांच्या पैकीं शेकडोंहून मोठा व शेकडोंहून लहान असा सोमदेव, बुद्धिमान, तप, विद्या व यश यांचें घर, गुणानें ज्यानें ऐश्वर्याला उजळा दिला आहे असा होता ( १८ ). तसेंच हा भगवान सर्व विद्यांचा आरसा, यशोधरचरिताची रचना करणारा, स्याद्वादोपनिषदाचा कर्ता आणि इतरही सुभाषितांची जुळणी करणारा, सर्व महासामंतांच्या भांगांची हद्द ज्यांनीं वेढली

आहे अशा मालांमुळें ज्याचे पाय सुगंधित झाले आहेत, ज्याचें यशःकमल सर्व विद्वज्जनांच्या कानाचा दागिना होत आहे, सर्व राजांच्या डोक्यांच्या पक्तींच्या शेंड्यांना भूषविण्यासाठीं ज्याचीं पदकमलें प्रमाण झालीं असा होता. स्वस्ति. श्रीपृथ्वीवल्लभ महाराजाधिराज परमेश्वर परमभट्टारक श्रीमत् अमोघवर्षदेवाच्या पायांचें अनुध्यान असलेल्या व ज्याचा विजय व राज्य वाढत आहे अशा अकालवर्ष श्रीकृष्णराजदेवाच्या पदकमलांवर उपजीविका करणारा, स्वस्ति, ज्यास पंचमहाशब्द मिळालेले आहेत, महासामंतांचा आधिपति, सर्व जगाकडून स्तुती होत असलेल्या चालुक्यकुळांत जन्मलेला, मत्त हत्ती, विद्याधर, प्रियगल्ल, त्रिभुवनमल्ल, उदात्त, नारायण, प्रत्यक्ष वाद्वाळि, विक्रमार्जुन, गुणनिधि, गुणार्णव, सामंतचूडामणि प्रभृति अनेक प्रशस्ति ( स्तुत्यर्थक विशेषणें ) व विजयचिन्हें यांच्या माळांनीं शोभलेला, अशा त्या अरिकेसरिन्नें वेमुलवाडा नावाच्या आपल्या राजधानीमधील आपला बाप श्रीमत् बद्यग याच्या शुभधामजिनालय नावाच्या बस्तीची किरकोळ मोडतोड, नवीन गिलावा ( किंवा चुना देणें ), बळि, नैवेद्य यासाठीं ८०० अधिक ८८ शकवर्षे झालीं असतां क्षय संवत्सर सुरू असतां वैशाखाच्या पौर्णिमेस बुधवारीं आतांच वर्णिलेल्या त्या सोमदेवसूरीला सब्बिदेशसहस्रामधील रेपाकद्वादशांतील वनिकट्टुपुलु नावाचा गाव त्रिभोगाभ्यंतरसिद्धि व सर्वनमस्य यांसह उदकधारेनें ( उदक सोडून ) दिला त्याच्या पूर्वेस दरियूरु, दक्षिणेस इळिन्दिकुंट, पश्चिमेस वेळ्ळाळपट्टु, उत्तरेस कट्टाकूरु. अशा प्रकारें चार सीमांनीं युक्त असलेल्या जमीनीनें युक्त व वारा आणि सूर्य यांचें पांघरूण नसलेला हा गाव. सामान्यो. बहुभिर्व. मद्वंश. स्वदत्त० अरिकेसरिन्नें दिलें. कवि पेद्दणानें सांगितलें. हें शासन शुभधामजिनालयांतील रेव यानें खोदलें.*

---

* हा ताम्रपट व वर उल्लेखिलेले इतर ताम्रपटशिलालेख यामध्ये आलेल्या ऐतिहासिक माहितीला इतरत्र आधार मिळतात की नाही हें पाहण्याची माझी खटपट चालूं आहे.

# १८ पुळुज येथील कानडी शिलालेख

(श्री. ग. ह. खरे.)

**उपलब्धि:**—पुळुंज हें गाव सोलापूर जिल्ह्यापैकीं पंढरपूर तालुक्यांत पंढरपूरच्या पूर्वेस ६ कोसांवर आहे. या गावांत एक शिवालय असून त्यांत जे लेख मिळाले ते क्रमानें पढें देत आहे.

१

हा लेख मुख्य शिवालयाच्या दक्षिणेस एक लहानसें उत्तराभिमुख देऊळ असून त्या देवळाच्या बाहेरच्या सोप्यांत उभा करून ठेवलेला आढळला. ज्या शिळेवर हा लेख कोरला आहे त्या शिलेची लांबी, रुंदी व जाडी $६\frac{१}{२}'$ $२\frac{१}{२}'$ व $\frac{५}{६}$ अशा असून वरचा सुमारें एक फूट उंचीचा भाग तिकोनी केला आहे. या तिकोनी भागांत डावीकडून उजवीकडे क्रमानें चंद्र, शिवलिंग, सूर्य, दुग्धप्राशी वत्सासह धेनू व तलवार यांच्या आकृति खोदल्या आहेत व त्याखालीं लेखाचा मजकूर खोदण्यास सुरवात केली आहे. या मजकुराच्या पहिल्या ७ ओळी लेखांत उल्लेखिलेल्या देवास त्याच्या भक्तानें मूळ लेख कोरल्यानंतर दिलेल्या दानासंबंधीं व मागाहून कोरलेल्या आहेत हें त्या ओळीखालीं 'नमस्तुंग०' हा श्लोक सुरू होत आहे व अक्षरांचें वळणही निराळें आहे यावरून उघड होत आहे. तेव्हां या लेखाचें वाचन देतांना त्या ओळी मी मागाहून दिल्या आहेत. लेखाच्या ओळी एकंदर ७३ आहेत. अक्षर आरंभीं सुमारें १ इंच उंचीचें असून जों जों खालीं जावें तों तों लहान होत गेलें असून लेखाच्या शेवटीं सुमारें $\frac{३}{४}$ इंच उंचीचें झालें आहे. लेखशिलेचा पृष्ठभाग घोटीव असल्यामुळें लेखन—फक्त एका ठिकाणाशिवाय—उत्तम स्थितींत आहे.

**अक्षरवटिका**— या लेखांतील अक्षरांचें सामान्य स्वरूप १२ व्या शतकांतील इतर लेखांप्रमाणेंच आहे. **म** दोन प्रकारांनीं काढला आहे. पैकीं एक प्रकार माहेश्वर (८), मूड (५०), १ मं (६३), इत्यादि शब्दांत व दुसरा प्रकार चिंतामणि (१४), महाजनं (२१), मने (२४), माडि (३५), इत्यादि शब्दांत आढळतो. **ळ** दोन प्रकारचा आहे. एक ळ गळछि (२४), सकळ (१०), मकळु (३७),

इत्यादि शब्दांत आला असून दुसरा म्हणजे नवीन ळ निळय (८), बळिय (२२), तळार (२४), हळ्ळुदिं (६२), इत्यादि शब्दांत आहे. र दोन प्रकारचा आहे. पैकीं जुना र मूरु (२७), कुरुवलगे (४९), केरेयिं (५०), इत्यादि शब्दांत असून नवीन प्रकार, कळांतरदिं (२७), हिरिय (५६), रायसेट्टि (५५), इत्यादि शब्दांत आढळतो. व दोन प्रकारचा आहे. पैकीं पहिला प्रकार, देव (१५), जादव (३०), हणवं (४२), पडुवलु (४९), इत्यादि शब्दांत आढळतो. दुसरा प्रकार भुवन(७), कवि (१९), पडुवलु (४६), इत्यादि शब्दांत आढळतो. ए दोन प्रकारचा आहे. एक सर्वसामान्य तऱ्हेनें काढला असून कित्येक ठिकाणीं ऐ कार करण्यासाठीं जो ए कार अक्षरास जोडतात तोच निव्वळ एकारासाठींही अक्षरांस जोडला आहे. उ. हूळजेय (४६), बट्टेयिं (४६), निवेसन (४८). अनुस्वार अक्षरांवर व अक्षरांपुढें अशा दोन्ही रीतींनीं काढलेला आढळतो.

**लेखनपद्धति**— विसर्गाबद्दल कांहीं ठिकाणीं परसवर्ण केला आहे. उ. नमाश्शिवाय (२). संस्कृत ल बद्दल अनेक ठिकाणीं ळ लिहिला आहे. ल क्वचितच आला आहे. स, श, ष यांची अनेक ठिकाणीं अदलाबदल झाली आहे. उ. भूशित (४), सरणागत (१०), सड्ड (११), स्रवण (१२), शर्म्म (१८), वरुशं (२८), सर्व्वनमश्य (२०), निवेसन (४८), सासन (४७). कांहीं ठिकाणीं ऋ बद्दल रि वापरली आहे. उ. क्रिपया (४), ह्रिदयाक्रुष्ट (१९). ऐ बद्दल य वापरल्याचीं कांहीं स्थानें आहेत. उ. शिवाचारय्क, लिंगय्को (५). रेफाबद्दल रु ही कांहीं ठिकाणीं आला आहे. उ. दरुशन (१२), वरुश (२८). इ बद्दल यि ही वापरलेली आहे. उ. सोम यिति (३). पहिल्या दहा ओळींत अनेक ठिकाणीं विसर्ग गाळले आहेत. यादव शब्दाऐवजीं जादव (३०) व मात्सर्य्यऐवजीं माच्छर्य्य (१२) लिहिलें आहे.

**भाषा**— या लेखांत संस्कृत व कानडी अशा दोन्ही भाषा उपयोजिल्या आहेत. पहिल्या १० ओळींपर्यंत व पुढें ६४, ६५, ६६ या ओळींत संस्कृत श्लोक असून बाकी सर्व मजकूर कानडी गद्य आहे. १९ ओळीं-

पर्यंतचा भाग वरवर पाहणारास जरी संस्कृत दिसला तरी वस्तुतः तो मजकूरही कानडीच आहे.

**कालनिश्चय**— या लेखांत कालाचा उल्लेख ‘सीद्धार्थि सवंतसरद माघ सु ११ सोमवार व्यतिपातदंदु’ असा आहे श. ११०० ते १२०० या दरम्यान श. ११२१ व श. ११८१ अशा दोन सालीं सिद्धार्थी सवंत्सर येतो. पैकीं श. ११८१ हें साल सिंघणाच्या मृत्यूनंतर येतें. तेव्हां तें येथें विवक्षित असणें शक्य नाहीं. अर्थात् श. ११२१ हेंच साल येथें विवक्षित आहे. मात्र श. ११२१ सालीं सिंघण राज्यावर बसला होता असें त्याच्या पाठीमागें जीं विशेषणें आहेत त्यांवरून दिसतें. सिंघणाचे कांहीं शिलालेख असे आहेत कीं, त्यांवरून सिंघणास श. ११२२ सालीं राज्याधिकार मिळाला असें ठरतें. त्या लेखांचा विचार केला तरीही सिंघण ११२१ सालीं राज्यावर असल्याचें ठरूं शकणार नाहीं. श. ११२०, ११२१ किंवा ११२२ या सालांपैकीं कोणत्याही सालीं माघ शुद्ध ११ ला सोमवार येत नाहीं. तेव्हां वार व मिती यांचा मेळ नाहीं असें म्हटलें पाहिजे. तिथी मुख्य धरली असतां तिजशी जुळती इंग्रजी तारीख इ. स. १२०० जानेवारी २८ ही येते.

**स्थलनिश्चय**—या लेखांत जीं स्थलनामें आहेत त्यांचीं हल्लींचीं मराठी व इंग्रजी नावें व मुख्य स्थलापासूनचीं अंतरें पुढें देतों.[1] बहुतेक सर्व स्थलें ओळखतां आलीं असून तीं हल्लींच्या सोलापूर जिल्ह्यापैकीं पंढरपूर, माढें व सोलापूर या तीन तालुक्यांत आहेत.

पूर्णे–र्ण्णजा–जे, हूळजे ( ओ. २, ३, २१, ३३, ४३, ४४, ४६ )= पुलुं–ळुंज. द्वारावती (ओ. २९)=द्वारका. इथ्थे ( ओ. ३४ )=इटे(Eeteh)= पुळुंजची पश्चिम २ मैल. कवडि ( ओ. ४०, ४१ ) = उत्तर कोंकण. पहा, मुंबई गॅझिटियर, व्हॉ. १, भाग २, पृ. २८३. सोइजण ( ओ. ४५ ) = सौदने (Sowduneh)= पुळजेची उत्तरेशान्य ७ मैल. कुरुवलगे (ओ.४९)–नाड ( ओ. ५५ ) = कुरूल (Koorool)= पुळजेची पूर्वेशान्य ११ मैल. देगावे ( ओ. ५२ ) = देगाव (Dehgaon)= पुळजेची आग्नेय ६ मैल. ललिगे ( ओ. ५२, ५३ ) = नळी (Nulee) = देगावची पश्चिम २। मैल.

१ इ. स. १८५२ मध्यें ईस्ट इंडिया कंपनीनें करविलेल्या नकाशावरून.

पत्थरिगे ( ओ. ५६ ) = पाथरी (Pathree)= कुरोलीची पूर्व ५॥ मैल. कोरवळिळ ( ओ. ५६ )= कुरोली (Korowlee)= पुळजेची पूर्वेशान्य १६ मैल. चिंचवळिळ (ओ. ५८, ७०)=फूल चिंचोली (Chincholi Phool)= पुळजेची उत्तर ४ मैल. आसुठिगे ( ओ. ६० ) = अष्टे (Ashteh) = पुळजेची वायव्योत्तर १८॥ मैल. रवळपळ ( ओ. ६० )=रोपळे (Ropleh)= अष्ट्याची दक्षिण ५ मैल. तूंगतूह ( ओ. ६२ )=तुंगत (Toongat) = पुळजेची वायव्योत्तर १०॥ मैल. एवन्तिगे ( ओ. ६२ )=येवती (Yewtee) = तुंगतचा उत्तर ४॥ मैल. पोरगावे ( ओ. ६३, ६४ )=पोहरगाव (Pohurgaon)=पुळुजेची पश्चिम ४ मैल.

**लेखसार**—यांत पहिल्या दोन श्लोकांत नमन झाल्यावर पुढें ज्या देवाला दान केलें त्या पुळुंजच्या सिद्धसोमदेवाचा व त्याचा भक्त अग्मिदेव याचा उल्लेख आहे. नंतर सिद्धसोमदेवासाठीं म्हणून त्याचा भक्त अंमुगिदेव याला, पुळुंजचे महाजन, यादव सिंघण, संकेय, देवेय व दायियनायक हे साहणि, कुमार सोइदेव, गंगिदेव, संकमदेव, बिज्जराणा, रवेयिदेव, जोइदेव इत्यादींनीं निरनिराळीं दानें दिल्याचें सांगितलें आहे. पुढें महामंडळेश्वर विक्रमादित्य याची बायको सिरियादेवी हिनें त्यानें वीर नागरसाचें देवालय बांधलें असतां, महाप्रधान सिंहेय साहणि, शिकारी तिपुरेय नायक, रायसेट्टि, जोइसेट्टि, महाप्रधानाचा खाजगी शिकारी इसय्य नायक, वामन नायक, लाहिदेव नायक व तंमय्य नायक यांनीं दिलेल्या निरनिराळ्या दानांचें वर्णन आहे. शेवटीं २ शापाशीर्वादात्मक श्लोकांनंतर दामोदर दंडनायकाचा हिशेबी लेखक चामुंडरस नायक यानें लेख लिहिल्याचें सांगितलें आहे.

## वाचन.*

( १ ) [चिन्ह*] ओं[1] नमस्तुंगशिरश्चुंबि चंद्रचामरचारवे [।*] त्रैलोक्यनगरारंभमूलस्तंभाय शंभवे [ चिन्ह* ] [ ॥१॥* ]

( २ ) नमश्शिवाय भक्तेभ्य परमानंददायिने[।*]सदा समीहितप्राप्तिहेतुज्ञानविधायिने ॥[२॥*] पुं

* ठशांवरून. १ ओं म्हणेचा. २ अनुष्टुभ् वृत्त.

( ३ ) र्ण्णजायां पुरे जातस्सिद्धसोम यि(इ)ति श्रुत(तः) [।* ] भक्ताना-
मुपकाराय त्रि(नृ)णां पापापनुत्तये [ ॥३॥* ]

( ४ ) एवं भूतो महालिंगो र(अ)हिकुंडळभूशित(तः) [ ।* ] क्रिपया
चाम्मिदेवस्य प्रत्यक्क्वः(ग्वः) समजा

( ५ ) यत ॥ [४॥* ] तत्पादपंकजभृंगो मुनिवत्पूजितो यति(तिः) [।*]
शिवाचारय्क( रैक)निरतो लिंगय्को(गैको) लिंगवेदक(कः) ॥[५॥*]

( ६ ) एतच्चित्रगुणैर्य्युक्तो अंमिदेवो महामति(तिः) [ ।* ] चकार
शासनं सम्यक्(ग्) गद्यपद्यसमन्वितं ॥[६॥* ]

( ७ ) [ चिन्ह* ] स्वस्ति समस्तभुवनस्तुत । समस्तजगतितळख्यात ।
समस्तजन सकारुण्य । वरदाभयहस्त । स

( ८ ) मस्तगुणगणनिळय । कामक्रोधलोभमोहमदमाच्छर्य्यदुरितकुळदूर ।
माहेश्व

( ९ ) रगणकुलांन्वयादिवाकर । अनादिसंसिद्धप्रसिद्धन । सासिद्धकुलां-
न्वयार्ण्णव । प्रव

(१०) र्द्धनसुधाकर । सर्व्वजीवदयापर । नगण्यपुण्यमूर्त्ति । सरणागतकर्म्म-
निर्म्मूळन । सकळ

(११) भूतचेतचैतन्यस्वरूप । नित्यनिरंजनप्रभावपरिपूर्ण्ण सद्गुदरुशान-
समाहि

(१२) त । दूरस्त्रवण दूरदरुशन । ज्ञानसंपंन । अणिमाद्यष्टगुणपरि-
पूर्ण्णघूर्ण्णिताण्र्णव

(१३) आचारकुळकुमुदिनिसरश्चंद्र होंगे हेंगे मंगे निरूपेक्षितशरिर ।
अज्ञानां

(१४) कुश । भक्तजनचिंतामाणि । गुरुचरणस्मरण । परिणतांत [*:] करण-
स्वरूप । वीरनागरस

---

१ अनुष्टुभ् वृत्त

(१५) लब्धवरप्रसाद । श्रीसिद्धसोमनाथदेवश्रीपादपंकजभ्रमर । लिंगैकदेहि । तेजोनिधिसर

(१६) सरणसंतान । श्रीअंमुगिघे(दे)वरसर्गं । [ चिन्ह* ] स्वस्ति समस्त-विज्ञातानेकवेदवेदांगतत्वज्ञानमर्त्त[1]

(१७) द्ज्वालामंडित पुंडरीकाक्षब्रह्मलक्ष्मीलक्षितविशाळवक्षस्थळहंसयुवति-विरा

(१८) जितर्मनोंनतरुं यजनयाजनाध्ययनाध्यापनदानप्रतिग्रहशट्कर्म निरतरुं ।

(१९) अष्टादशस्मृतिपुराणकाव्यनाटकभंगीभाषणकविगमकीवादिवाग्मिन्हिद-याकृष्ट

(२०) मंत्राक्षररुं प्रतिपंनशिलाक्षररुमप्प श्रीमतु दक्षिणवारणासी सर्व्वनमश्यदु

(२१) तमदग्रहारं पूर्ण्णजेयशेषमहाजनंगळु श्रीसोमनाथदेवर्गे वूरिं मूडवोल

(२२) गण [प*] तिगेगेयिंय मूड गण[प*] तिगेय्य बट्टेयिं बडगलु ब्रित्ति[2] आ केय्य बळिय मने सि

(२३) द्धेश्वरदेवर केरियिं तेंकलु वूरुगोटे तनक केरि वूरिं पडुवलु हूदोट १ मं धाराप्

(२४) र्व्वकं माडि कोट्टरु आ केरिय मने मळवकेयिगळाळ्ळि अपुत्रिकदंद आय दाय कोळ्ळि कळ्ळ तळार

(२५) गूळि हालु कूळु बिट्टि वूरुगोटे बेळि सुंक तोलगडे पाळिकाय आ केरिय अंगडि घाणयि

(२६) न्तिदेल्लवं सर्व्वाबाधेपरिहारवागि कादूडुवरु ॥ आ महाजनंगळिगे अंमुगिदेवरसरु

---

१ या वाचनाविषयीं शंका आहे. २ ह्री गे गाळावी. मूळांत जास्त आहे असें वाटतें.

(२७) दंम्म १ र कळांतरदिं कोट्ट प्रियश्राहे गजमल्लगद्याण ६ आ कळां-
तरद मूरु हॊनुमं

(२८) वरुशं प्रति नागरसन पर्ब्बदलु आचंद्रार्क्कतारंबरं अशेषमहाजनंगळुं
भोजन माडुवरु ॥

(२९) [चिन्ह*] स्वस्ति समस्तभुवनभवनाश्रयं श्रीपृथ्विवल्लभं महाराजा-
धिराज परमेश्वर द्वारावतिपु

(३०) रवरादिश्वर विष्णुवंशोद्भव जादवकुळकमळकळिकाविकासभास्कर
गूर्ज्जरहृदयजर्ज्झर

(३१) माळवेश्वरमदनमहेश्वर दाहळहृत्कुतूहळ चोळगळगाळ प्रबळ-
तरहोइ

(३२) सणलक्ष्मीहरण सकळलक्ष्मीपतिप्रतापचक्रवर्त्ति श्रीसिंघणदेवरसरु
सीद्धार्त्थि सं

(३३) वत्सरद माघ सु ११ सोमवार व्यतिपातदंदु पूर्णजेगे बंदाह्लि देवता
र्च्चनेय समेयंद

(३४) लु श्रीस्वयंभु सिद्धसोमनाथदेवर्गॆन्दायिश्थेयवनु सर्व्वनमस्यवागि
अंमुगिदेवरसर्गॆ

(३५) अकरपरिहारवागि धार[ा*] पूर्व्वकं माडि कोट्टरु । आ हळ्ळियलु ।
तहभत्तके सुं

(३६) क अंबिलि गद्याण ओवाडविल(लु)[चिन्ह*] आ हळ्ळिय वोळगण
देवपमहलेयन प्रभुत्वद कम

(३७) त मत्तरु नूरुमं बळिसहितवागि श्रीसिद्धसोमनाथदेवर्गॆन्दु अवर
मकळु जतलट्टद संके

(३८) य साहणिदेवेय साहणि दायियनायक कुवर सोइदेवयिन्ती
नाल्वरुं अंमुगि

---

१ संस्कृत अ बद्दल कानडींत ए आदेश कधीकधी होतो. पहा. एपि.इंडि. १३, ३७

(३९) देवरसगर्गे धारापूर्व्वकं माडि सर्व्वनमश्यवागि कोट्टरु आ हळ्ळिय कोळ्ळिवणवं श्रीसिद्ध

(४०) सोमनाथदेवर्गे राजबिज्जअय्यण देवन पर्म्म(र्व्व)वेंदु गंगिदेव संकम-देव बिज्जराणेय कवडिय खे

(४१) यिदेव कवडिय जोइदेवंगळु सर्व्वनमश्यवागि धारापूर्व्वकं माडि कोट्टरु । अल्लि फळितमं

(४२) दे हाग हणवं कोंडवनु गोमाससुरापान माडिदवनु स्वानगार्द्धप(भ) चांडाळ । [ चिन्ह* ] स्वस्ति समस्तप्रशस्तिसहि

(४३) तं श्रीमनु महाम(मं)डळेश्वरं साहसोत्तुंग भुजबळभीम विक्रमादित्य देवरसरु पूर्ण्ण

(४४) जेयलु वीरनागरसन देवाल्ययमं माडिसिदल्लि श्रीसिद्धसोमनाथदेवर्गे स्वस्तियनवरतक

(४५) ल्याणाभ्युदयसहस्रफळभोगभागिनियरप्प सिरियादेवियरु सोइजण दल्लि वूरिं तेंक

(४६) हूळजेय बट्टेयिं पडुवलु तेंकलु लखुमादेविय केय्य सीमेइं पडुवलु हव्ळ बडगलु सा

(४७) सर्सन मरियादे मत्तरु १०० अल्लि देवभावियिं तेंक हूदोट १ असगेश्वर देवर केरिइं

(४८) हिंदे केरि १ बणबेय निवेसन १ मं सर्व्वनमश्यवागि धारापूर्व्वकं माडि कोट्टरु ॥ [ चिन्ह* ] मत्तं दे

(४९) वर्गे श्रीमनु महाप्रधानं सिहेय साहणियरु कुरुवलगेयल्लि वूरिं पडुवलु मुं

(५०) जळेय केरेयिं मूड मत्तरु १०० अदर बळिय मने नारायणदेवर केरियिं मूडगण

---

१ ह्या स गाळावा, जास्त आहे.

(५१) मरदिं तेंक केरि १ म(मं) धोर[ा*]पूर्व्वकं माडि कोट्टरु ॥ मत्तं श्रीसिद्धसोमनाथदेवर्गे श्रीमनु महापसा

(५२) यितं बेंटेकार तिपुरेय नायकरु देगावेयल्लि वूरिं पडुवलु ललिगेय सीमेयिं

(५३) पडुवलु ललिगेय बट्टेयिं बडगलु मत्तरु[1] २६ अदर बळि ऊरुगव-नीयिं मूड मने १ उ.रिं मू

(५४) ड बाविय मूडदेसेय हूदोट १म(मं) सर्व्वनमश्यवागि कोट्टरु [ चिन्ह* ] स्वस्ति समस्तप्र

(५५) शस्तिसहितं श्रीमतु रायसेट्टि गंडभेरुंड जोइसेट्टियरु तमकुरुव-ल्ग नाडोळगण को

(५६) रवळ्ळियल्लि वूरिं मूड चट्टण हळ्ळदिं मूड पत्थरिगेय बट्टेयिं बडगलु हिरिय हळ्ळदिं

(५७) तेंकलु कोलमत्तरु[2] २६ कंचगार गेरिइं बडगलु मेळिसंखरदेवरिं मूडलु केरि १ बणबे निवेशन [ चिन्ह* ] मत्तं

(५८) चिंचवळ्ळियल्लि वूरिं तेंक हळ्ळदिं मूड चंमुराणेयन मळवदिं पडुवलु हूदोट १ सर्व्वनमश्य

(५९) वागि कोट्टरु स्वस्ति समस्तप्रशस्तिसहितं श्रीमनु महाप्रधान मंनेय बेंटेकार इसय्य नायकरु

(६०) श्रीसिद्धसोमनाथदेवर्गें आसुठिगेयल्लि रवळपळद बट्टे बिवदळेइं पडुवलु त्रिति १ जक्कियर भावि[3]

(६१) रेवण मड्डुव हूदोट १ वासुदेवन मनेय हत्तिद मने १ सर्व्वनमश्य धारापूर्व्वकं माडि कोट्टरु

(६२) श्री वामन नायकरु तुंगतूहदलु वूरिं बडगलु हळ्ळदिं पडुवलु एवन्तिगे बट्टेइं मुड हूदो

१ धा ओळी खालीं लहान काढला आहे. २ या पुढील आकडा नीट लागला नाहीं. ३ जक्कियर भावि या शब्दप्रयोगासाठीं पहा. एपि. इंडि. १३, ४९

(६३) ट १ निवेशन १ मं सर्व्वनमश्यवागि कोट्टरु [ चिन्ह* ] श्रीमत् ल(आ?)हिदेव नायक तंमय्य नायकरु पोर

(६४) गावेयल्लि इरेयद सिद्धेश्वरदेवर केयि( यिंय ) पडुव मत्तरु १२ मं सर्व्वनमश्यवागि कोट्टरु ॥ बहुभिर्व्वसुधा दत्ता

(६५) राजभिस्सगरादिभि [:।*] यस्य यस्य त(य)दा भूमि [:*] तस्य तस्य तदा फलं ॥ स्वदत्तं(त्तां) परदत्तं(त्तां) वा यो हरेत वसुधरा(रां) शष्टिव

(६६) रुश सहस्राण(णि) विष्ठायां जायते क्रिमिः ॥ श्री दामोदर दंडनायकर श्रीकरणं चमुंडरस नायकर लिपि

[ आरंभी पण मागाहून खोदलेला भाग* ]

(६७) चट्टिसेट्टि चाडिसेट्टि देवल्या इदु

(६८) गे—रयन्तरदु कोट्टरु आत्यांतिकवागि

(६९) अंमयंगळ केय्यलि ओंदु होंन कोंडु सर्व्वमान्यवागि सोमनाथदेवरि

(७०) गे चिंचवळिय चट्टेयिं पडुवलु जज्जुगी नायकन स्तळादिं मूडलु झंझे-श्वरदेवल ( र ? ) केइं तें

(७१) कलु गणपतिय केयिं बडगलु एरडुहान्नि मत्तरु केइय स्तळ वनुसळ पडियागि आ

(७२) केय्य बणबे खेयियनिं तेंकलु सोमय्यानिं बडगलु आ केरे खेयियनिं पडुवलु...

(७३) म- अंमयंगळिगे वाइयनु क्रयवागि मारिदरु आ व्रित्तिगे अशेष महा जनगंळु........

## भाषांतर.

( ओ.१–६ ) ओं. नमस्तुंग (१). भक्तांना परम आनंद व इच्छित प्राप्तीच्या हेतूंचें ज्ञान देणाऱ्या शिवाला नमस्कार [ असो ] ( २ ). भक्तां-वर उपकार करण्यासाठीं व मनुष्यांचें पाप नाहींसें करण्यासाठीं पूर्णजा-पुरांत झालेला, ' सिद्धसोम ' असा म्हटला जातो ( ३ ). अशा प्रकारें

१ सु खाली घ काढला आहे. २ हा सात ओळीचा मजकूर चांगलासा लागत नाहीं, म्हणून पुढें भाषांतर दिलें नाही.

झालेला, सर्पकुंडलानीं भूषित, असा महालिंग अग्निदेवाच्या कृपेनें पुन्हां उत्पन्न झाला (४). त्याच्या पदकमलीं भृंग असलेला, ऋषीप्रमाणें पूजिलेला, शिवाचारांमध्यें पूर्ण निरत, लिंगरूप, लिंगज्ञानी, अशा विलक्षण गुणांनीं युक्त, महामति, अशा अग्निदेव यतीनें [ हें ] उत्तम गद्यपद्ययुक्त शासन केलें ( ५,६ ).

( ओ. ७–२८ ) स्वस्ति. सर्व जगानें स्तविलेला, सर्व जगतीतळावर प्रसिद्ध, सर्व लोकांविषयीं दयाळू, वरद व अभय अशा हातांनीं युक्त, सर्व गुणसमुदायाचें घर, काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मात्सर्य या पापसमुदायापासून दूर, माहेश्वरगणांच्या समुदायांतील कुळांना सूर्य, अनादिकालापासून उत्कृष्ट सिद्ध असलेला, सिद्धसमुदायाचा समुद्र वाढविण्याचे कामीं चंद्र, सर्व जीवांविषयीं दयापरायण, अगण्यपुण्याची मूर्ति, शरणागताचें कर्म निर्मूल करणारा, सर्व प्राण्यांच्या चित्तांचे चैतन्यरूप, नित्य व निरंजन अशा प्रभावांनीं परिपूर्ण, षड्दर्शनांनीं युक्त, लांबचें ऐकणारा, लांबचें पाहणारा, ज्ञानसंपन्न, अणिमादि अष्टसिद्धींनीं पूर्ण असा खवळलेला समुद्र, आचारसमुदायरूपी कुमुदवेलींच्या तळयाला चंद्र, सोनें, स्त्री, जमीन यांना शरीरानेंही तिरस्कृत केलेला, अज्ञानाला अंकुश, भक्तजनांना चिंतामणि, गुरूच्या चरणांचें स्मरण असणारा, ज्याच्या अंतःकरणाचें स्वरूप परिणत आहे, वीर नागरसाकडून वररूपी प्रसाद मिळालेला, श्री सिद्ध सोमनाथ देवाच्या श्रीपदकमलांच्या ठिकाणीं भृंग, लिंगरूप देह झालेला, अशा श्री अंमुगिदेवाला

स्वस्ति, अनेक वेदवेदांगतत्त्वज्ञानें ज्यांनीं पूर्ण जाणलीं आहेत, विष्णूच्या विशाल छातीवरील, ब्रह्म, लक्ष्मी, सरस्वती, यांच्या चिन्हांनीं युक्त, मनानें उन्नत, यजन, याजन, अध्ययन, अध्यापन, दान, प्रतिग्रह या षट्कर्मांत निरत असलेले, ज्यांच्या उपदेशाचीं अक्षरें अठरा स्मृति, पुराणें, काव्यें, नाटकें, कोटिक्रम, कवि, गमकी[1] व जाणणाऱ्या वाग्मीचेंही हृदय ओढतात, ज्यांना शिलालेख समजतात अशा, दक्षिण काशी, सर्वनमस्य, व अग्रहार असलेल्या पूर्णजा गावांतील सर्व महाजनांनीं श्री [ सिद्ध ] सोमनाथ देवासाठीं, गावाच्या पूर्वेस, गणपतीच्या शेताच्या पूर्वेच्या, गणपतीच्या शेताच्या वाटेच्या उत्तरेच्या २ वृत्ति [ व ] त्या शेताशीं संलग्न असलेलें घर,

१ गमकी = वाचक, लिपिय नोडुवं. पहा किटेल कोश.

सिद्धेश्वर देवाच्या रस्त्याच्या दक्षिणेस, गावाच्या कोटापर्यंत[असलेला] रस्ता, व गावाच्या पश्चिमेस असलेली एक बाग धारापूर्वक करून दिली. त्या रस्त्यावरील घर व मळई[1] शेत याबाबतींत निपुत्रिक, आय, दाय, लूट, चोर, तराळें[2], बेगार, दूध, दुष्ट, वेठ, गावाचा कोट, कुंपण, जकात, तोलगडे[3], पारिकार्ये, त्या रस्त्यावरील दुकान, घाणा या सर्व गोष्टींचा त्रास होऊं नये अशा रीतीनें तीं दान करून दिलीं. त्या महाजनांना अम्मुगिदेवरसानें १ दाम वार्षिक[4] व्याजानें दिलेल्या ६ गजमल्ल गद्याणांवरील व्याजाच्या ३ होनांत दरवर्षी नागरसाच्या पुण्यतिथिकालीं चंद्र सूर्य तारे आकाश असेतों सर्व महाजन भोजन घालतील.

( ओ. २९ ते ४३ ) स्वस्ति, समस्तभुवनाश्रय, श्रीपृथ्वीवल्लभ, महाराजाधिराज, परमेश्वर, द्वारावतिपुरवराधीश्वर, विष्णुवंशोद्भव, यादव-कुलरूपी कमलकलिकेचा विकास करणारा सूर्य, गुर्जरांच्या हृदयांना जर्जर करणारा, मालवराजरूपी मदनाला शंकर, दाहळदेशीय मनुष्यांचें कुतूहल, चोळाच्या गळयाचा काळ, प्रबळतर होइसणां( होयसळां ) ची लक्ष्मी हरण करणारा, सर्व ऐश्वर्याचा मालक व प्रतापचक्रवर्ति अशा श्रीसिंघण-देवानें सिद्धार्थी संवत्सराच्या माघ शुद्ध एकादशीस, सोमवारीं, व्यतिपात असतां, पुळुजेस येऊन देवतेच्या पूजासमयीं, श्रीस्वयंभू सिद्धसोमनाथ देवासाठीं म्हणून इथे हें गांव अंमुगिदेवरसाला कायमचें सर्वनमस्यरूपानें उदकपूर्वक करून दिलें. त्या गावांतील तपस्व्यांनीं सुंक, अंबिलि, गद्याण हीं द्यावयाचीं नाहींत. त्या गावापैकीं ‘देवपमहलेय’ च्या मालकीचे

---

१ मळव हा शब्द किटेल कोशांत सांपडत नाहीं. याचा अर्थ मळई जमीन असा असावा.

२ तळार हा शब्द तद्भव असून स्थळवार या शब्दांत त्याचें मूळ असल्याचें किटेल सांगतो. याच्या कामाचें ‘चोरी झाली असतां ती भरून द्यावी’ असें जें वर्णन आहे त्यावरून या शब्दाचा तराळ या शब्दाशीं संबंध जोडावासा वाटतो. पहा एपि. इंडि. १५, ८०

३ या शब्दांचे अर्थ नीट ध्यानांत येत नाहीत.

४ प्रिय या शब्दाचा अर्थ ध्यानांत येत नाहीं. पिरिय किंवा हिरिय शब्दाशीं संबंध असेल काय ? श्राहे शब्दाचा अर्थ बारा महिन्यांचा काळ. पहा इंपि. एंडि. १५, ८० टीप २

१०० कंमतं मत्तर, बलिसह श्रीसिद्धसोमनाथ देवाला म्हणून, त्याची मुलगी, अतलट्टाचा संकेय साहणिदेवेय, साहाणि दायिय नायक, कुमार सोइदेव या चारांनीं अंमुगिदेवरसाला धारापूर्वक, सर्वनमस्य रूपानें करून दिले. त्या गावाचें कोळिळवणं, श्रीसिद्धसोमनाथदेवाला, राजबिज्ज अय्यण देवाच्या पर्वदिनीं गंगिदेव, संकमदेव, बिज्जराणा, कवडी (द्वीपा)चे खेयिदेव व जोइदेव यांनीं सर्वनमस्यरूपानें उदकपूर्वक करून दिलें. तेथें उत्पन्न झालेल्याचे हागं, पण घेणारा, गोमांस खाणारा, सुरापानी, कुत्रा, गाढव. चांडाळ आहे.

(ओ. ४३–५४) स्वस्ति, सर्व प्रशस्तिसह असलेला, महामंडळेश्वर, मोठा साहसी, भीमासारखा शक्तिमान, अशा विक्रमादित्य देवानें पुळजेंत वीरनागरसाचें देवालय बांधिलें असतां, श्रीसिद्धसोमनाथ देवासाठीं, अखंड कल्याण व अभ्युदय यांचीं हजारों फळें भोगण्यांत भाग घेणारी सिरियादेवी हिनें, सोइजणमध्यें, गावाच्या दक्षिणेस, हूळजेच्या वाटेच्या दक्षिणपश्चिमेस, लखुमादेवीच्या शेताच्या सीमेच्या पश्चिमेस, नाल्याच्या उत्तरेस, १०० मत्तर, (तसेंच) तेथील देववापीच्या दक्षिणेस एक बाग, असगेश्वर देवाच्या रस्त्याच्या पाठीमागील एक रस्ता, कडब्गाचें (कडब्यासाठीं) एक घर, सर्वनमस्यरूपानें, उदकपूर्वक (दान) करून दिलें. आणि देवासाठीं, महाप्रधान सिंहय साहाणि यानें, कुरुवलगे गावांत, गावाच्या पश्चिमेस, मुंजळेच्या तलावाच्या पूर्वेस, १०० मत्तर, त्यांतील घर, नारायणदेवाच्या रस्त्याच्या पूर्वेस व आडाच्या दक्षिणेस एक रस्ता, उदकपूर्वक (दान) करून दिला. आणि श्रीसिद्धसोमनाथ देवाला, (राजाची) फार मर्जी असलेला शिकारी, तिपुरय नागक यानें देगाव

१ कम्मत म्हणजे मालकानें स्वतःच्या सामानानीं [illegible] पण मजुरा करवी कसलेली (जमीन). पहा. एपि. इंडि १५, ३२८ टीप २

२ कोळ्ळिवण या शब्दाचा अर्थ नीट समजत नाही. कोळिक शब्दाचा कोलीत असा अर्थ किटेल देतो. कदाचित् हेमूर्णाचे रान असा या शब्दाचा अर्थ असेल.

३ हाग=१/४ पण. एक नाणें.

४ महापसायेत याचा राजाच्या कपड्यावरचा मुख्य असा दुसरा अर्थ आहे. पण तो येथें लागूं पडत नाही. पहा. एपि. इंडि. १३, ३१४.

मधील, गावाच्या पश्चिमेचे, लळिगेच्या सीमेच्या पश्चिमेचे, लळिगेच्या वाटेच्या उत्तरेचे २६ (?) मत्तर, त्या गावापैकी वेशीच्या पूर्वेचे एक घर, गावाच्या पूर्वेच्या विहिरीच्या पूर्वेचा एक बाग, सर्वनमस्य म्हणून दिला.

( ओ. ५४-५९ ) स्वस्ति, सर्वप्रशस्तियुक्त, रायसेट्टि, गडंभेरुंड जोइसेट्टि, यांनीं कुरुवलगे देशापैकीं, कोरवळ्ळिमधील, गावाच्या पूर्वेस, चक्राच्या ओढ्याच्या पूर्वेस, पत्थरिगेच्या वाटेच्या उत्तरेस, थोरल्या ओढ्याच्या दक्षिणेस, ( असलेले ) कोल मत्तर २६ (?), कासाराच्या रस्त्याच्या उत्तरेस, मेळिसंखरदेवाच्या पूर्वेस, ( असलेला ) रस्ता, कडब्याच्या गंजीसाठीं घर, आणि चिंचवळ्ळिपैकीं गावाच्या दक्षिणेस, नाल्याच्या पूर्वेस, चंमुराण्याच्या मळईच्या पश्चिमेस असलेला एक बाग, सर्वनमस्य-रूपानें दिला.

( ओ. ५९-६६ ) स्वस्ति, सर्व प्रशस्तींनीं युक्त, महाप्रधन खाजगी शिकारी इसव्य नायक यानें श्रीसिद्धसोमनाथ देवाला, आसुठिगे गावापैकीं खळपळ्याची वाट व बिवद्ळे यांच्या पश्चिमेस एक वृत्ति, यक्षींची विहीर, रेवणकृत एक बाग, वासुदेवाच्या घरास लागलेलें एक घर, सर्वनमस्यरूपानें धारापूर्वक करून दिलें. श्रीवामन नायकानें तुंगतूह गावापैकीं, गावाच्या उत्तरेस, नाल्याच्या पश्चिमेस, एवन्तिगेच्या वाटेच्या पूर्वेस, एक बाग व एक घर, सर्वनमस्यरूपानें दिलें. श्रीमंत लाहिदेव नायक व तंमय्य नायक यांनीं पोरगावपैकीं इरेयाच्या सिद्धेश्वरदेवाच्या शेताच्या पश्चिमेस असलेले १२ मत्तर सर्वनमस्यरूपानें दिले. बहुभिः० स्वदत्तां० श्रीदामोदर दंडनायकाचा हिशेबी लेखक चमुंडरस नायक यानें लिहिलें.

२

हा शिलालेख मला पुळुंज येथेंच मिळाला. येथील मुख्य देवाच्या म्हणजे लिंगेश्वराच्या देवळास हेमाडपंती थाटाचे २ सभामंडप आहेत. या दोहोंपैकीं दर्शनास जातांना प्रथम लागणारा मागाहूनचा असून त्या-पुढचा अगोदरचा असावा. पहिला मंडप ओलांडून दुसऱ्यांत जातांना जें दार लागतें त्या दाराच्या डाव्या अंगास भिंतींत हा शिलालेख आहे.

३ गवनी याचा अर्थ गावाची वेस असा आहे. पहा एपि. इंड. १३, २१

याच्या पुढेंच नवीन मंडपाचा खांब आला आहे व भिंत आणि खांब यां-मधील फट कमरेइतकी बांधून काढली आहे. यामुळें लेखाचा बहुतेक भाग बुजून गेला आहे. जो भाग दिसत आहे तोही तिन्ही बाजूंनीं फुटून गेला आहे. यामुळें लेखाचा फारच थोडा भाग शाबूत आहे. दिसणाऱ्या भागाची लांबीरुंदी ११ व ९ इंच आहे.

अक्षरांचें सामान्य स्वरूप मागें वाचलेल्या लेखाप्रमाणेंच कानडी वळणाचें आहे. लेखाची भाषा कानडी आहे.

लेखाचा काल २७ व्यय संवत्सर सुध...... सोमवार असा आहे. २७ हें वर्ष राज्याभिषेकाचें आहे. या वर्षाला जुळतां असा संवत्सर व्यय हा दिला आहे. मी पूर्वी वाचलेला लेख सिंघणाचा आहे. हाही लेख सिंघ-णाचा आहे असें वाटतें. यादवनारायण, प्रतापचक्रवर्ती व सिंहण हे शब्द फुटक्या भागांतून लावतां येतात. सिंघणाचा काळ शक ११३२ ते श. ११६९ असा आहे. या काळाच्या दरम्यान गत शक ११४८ ला व्यय संवत्सर येतो. श. ११४८ हें जर राज्याभिषेकाचें २७ वें वर्ष आहे तर श.११२१ हें राज्याभिषेकाचें पहिलें वर्ष येतें. डॉ. फ्लीट यांनीं इतर २ लेखां-च्या आधारानें श. ११२२ हें सिंघणाच्या यौवराज्याभिषेकाचें पहिलें वर्ष मानावें असें नमूद केलें आहे. या लेखानेंही तीच गोष्ट सिद्ध होत आहे.

मागील लेखांत पुळुंज गांवाला संस्कृत भागांत पूर्णजा व कानडी भागांत हूळजे असें म्हटलें आहे. येथें ' पूर्नजे ' असा शब्द आला आहे.

हा व पाठीमागील लेख आणि येथील इतर लेख यांत अंमुगिदेवाचा उल्लेख येतो. यास निरनिराळीं दानें दिलीं आहेत. हें देऊळ पूर्वी वीरशैवांचें होतें व हल्लींही आहे. आर्. नरसिंहाचार्य यांनीं आपल्या ' कर्नाटककवि-चरिते ' या ग्रंथाच्या पहिल्या व्हॉल्यूममध्यें पृ. १९४ वर अमुगिदेवय्य नांवाच्या एका वीरशैव वचनकाराची माहिती दिली आहे. त्याचा काल त्यांनीं सुमारें ११६० इसवी हा दिला आहे. श. ११२१ च्या लेखांत एका अंमुगिदेवाची कांहीं माहिती आली आहे. तेव्हां नरसिंहाचार्य यांनीं उल्लेखिलेला अंमुगिदेव व या लेखांत आलेला यांचा कांहीं संबंध असेल काय ? शिलालेखांत अंमुगिदेव असें नांव आहे व नरसिंहाचार्य अमुगिदेव असें नांव देतात. त्याच्या वचनांत अमुगेश्वरलिंग असें नांव येतें, येवढा तिहीमध्यें फरक आहे. काल मात्र जवळ जवळ एकच आहे,

( १ ) मुगिदेव[1]..........
( २ ) [ श्रीम ] तु यादव [ना]....
( ३ ) ....ण प्रतापचक्रवर्त्ती सि [ह]....
( ४ ) ....र्षद २७ नेय व्यय सं [व]....
( ५ ) ....क सुध........सोमवारदं
( ६ ) [स] र्व्वनमस्य पूर्नजय....
( ७ ) .... [नं]गळिगे अंमुगिदेवन तं....
( ८ )....ककेगे द समेय[2]

---

# १९ भिवघाट येथील कानडी शिलालेख*

( श्री. ग. ह. खरे )

**उपलब्धि:**—प्रस्तुत शिलालेख मु. नेलकरंजी ता. आटपाडी स. औंध येथील रानांत असलेल्या भीमाशंकराच्या देवळांत होता. पूर्वी तो लेख स्थानिक लोकांनीं देवळाच्या बांधकामांत घातला होता. पण श्रीमंत पंत-प्रतिनिधि यांच्या नजरेस ती गोष्ट येतांच त्यांनीं तो बांधकामांतून काढवून औंध येथें आणविला आहे. लोकांनीं तो बांधकामास योग्य करण्या-साठीं त्याच्या उजव्या अंगाचा भाग तोडून काढल्यामुळें प्रत्येक ओळीचा उजव्या बाजूचा शेवटचा कांहीं भाग नाहींसा झाला आहे. या लेखाची लांबी,रुंदी ४' ४" व १' १" ते १' ४" असून वरचा सुमारें ९ इंच भाग व खालचा २।३ इंच भाग कोरा आहे. पैकीं वरच्या कोऱ्या भागांत पूर्वी शिवलिंग वगैरे चित्रें असण्याचा संभव आहे. सध्यां तो छिनून काढलेल्या स्थितींत आहे. लेखावर ऊन, पाऊस, वारा व मनुष्यानें अज्ञानानें केलेले आघात यांचा परिणाम होऊन तो अगदीं अस्पष्ट होऊन गेला

---

१ या ओळींतील अक्षरें इतर ओळींतील अक्षरांच्या मानानें लहान आहेत.
२ पुळुंजचे आणखी दोन लेख मजपाशीं आहेत. ते पुढें सवडीनें प्रसिद्ध करीन.
* पा. स. ६।१८५५

असल्यानें वाचणें व त्याचे ठसे घेणें अवघड झालें आहे. बऱ्याच ठिकाणीं लेख अगदीं लागेनासा झाला आहे.

**लिपी, लेखनपद्धति व भाषा:**—लेखाची लिपी शकाच्या १२ व्या शतकांतील कानडी लिपीशीं जुळणारी आहे. जुने र व ळ यांचा उपयोग क्वचितच केला आहे. म चें एकच रूप आढळतें. जिव्हामूलीय व उपध्मानीय यांचा उपयोग कोठें केलेला दिसत नाहीं. व, स, क, या अक्षरांबद्दल कांहीं ठिकाणीं य, श, ख हीं अक्षरें वापरलेलीं दिसतात. या लेखांतील आरंभींचा ' नमस्तुंग० ' हा श्लोक सोडून देतां बाकी सर्व लेख जुन्या कानडी भाषेंत असून गद्य आहे. जुनें कानडी संस्कृतप्रचुर असल्यानें या लेखांतही संस्कृत शब्दप्रयोग पुष्कळ आहेत.

**काल:**— या लेखांत कालाचे दोन उल्लेख आहेत. पैकीं पहिला विजय संवत्सर पौष शुद्ध १५ सोमवार उत्तरायणसंक्रमण या अर्थी आहे. या उल्लेखावरच कळचुर्य सोयिदेव राज्य करीत असतांना असें म्हटलें असल्यानें हा विजय संवत्सर त्याच्या कारकीर्दींतील होय. सोयिदेव श. १०८९ ते १०९८ पर्यंत राज्य करीत होता व श. १०९५ ला विजय संवत्सर येत असल्यानें या विजय संवत्सराच्या उल्लेखानें गत शक १०९५ हें साल विवक्षित आहे. या सालीं पौष शुद्ध द्वादशीला सोमवार होता पण मकरसंक्रांत आणखी एक आठवड्यानें म्हणजे सोमवार पौष वद्य तृतीया या दिवशीं लागत आहे. श. १०९४ किंवा १०९६ या दोन्ही वर्षीं वरील तऱ्हेचा योग जुळून येत नाहीं. तेव्हां मितींत कोठें तरी चूक झाली आहे असें म्हणावें लागतें. पौष शुद्ध द्वादशीस इंग्रजी तारीख १७ डिसेंबर ११७३ ही येते. कालाच्या दुसऱ्या उल्लेखांत संकमदेव राज्य करीत असतां येवढ्याच अर्थाचे शब्द लागतात. कळचुर्य संकमदेव श. १०९८ ते ११०२ पर्यंत राज्य करीत होता. तेव्हां या लेखांतील दुसऱ्या भागांतील दान श. १०९८ ते ११०२ या दरम्यान झालें असावें.

**स्थळ**—या लेखांतील स्थळांचीं नावें नीटशीं लागत नाहींत. पण एक गोष्ट मात्र स्पष्ट आहे कीं, ज्या गांवांतील जमिनी देवास दान केल्या आहेत तीं गावें **पाडे** नांवाच्या नाडांत म्हणजे देशांत होतीं. ज्या गावाच्या हद्दींत हा लेख होता तें गांव आटपाडी तालुक्यांत आहे. पूर्वीं तें आटपाडी महालांत होतें. या महालाची दक्षिणेकडील स्वाभाविक हद्द भिवघाटाचा

डोंगर आहे. तेव्हां येथें पाडे या शब्दानें आटपाडी हें गांव विवक्षित असावें. संस्कृत ईकारांत स्त्रीलिंगी ग्रामवाचक नामें कानडींत एकारांत नपुंसकलिंगी होतात. जसें वनवासी→बनवसे वगैरे. त्याप्रा‍णे येथें पाडीचें पाडे झालें असावें. दानांत ज्या गावांचा उल्लेख आला आहे त्यांचीं नावें करजयरव( खे )ड व नारविगावे अशीं लागतात. या दोन नांवांचें मिळून कदाचित् नेलकरंजी असें जोड नांव झालें असण्याचा संभव आहे. भिवघाटाच्या बरोबर दक्षिणेस २।३ मैलांवर करंजें नांवाचें एक गांव आहे. तें करजय या नांवानें विवक्षित असलें तर वरील संभव ठरत नाहीं. मग नारविगावे हें दुसरीकडे कोठें तरी शोधलें पाहिजे असें होतें. पहिल्या दानाच्या वेळीं सोविदेवाचा मुक्काम मंगळवाड येथील स्थिर शिबिरांत होता असें लेखांत नमूद आहे. मंगळवाड म्हणजे हल्लींचें मंगळवेढें हें गांव असावें. पूर्वी हें गांव फार प्रसिद्ध असून तेथें एक लहानसा संस्थानिक असल्याचें संस्कृत व फारसी साधनांत नमूद आहे. श. १०६९ च्या म्हसवड येथील अप्रसिद्ध लेखांतही मंगळिवेड हें कळचुर्य बिज्जणाचें स्थिर शिबिर होतें असें सांगितलें आहे. आणखीही अनेक ठिकाणीं मंगळवेढें हें स्थिर शिबिर असल्याचें कळचुर्यांच्या लेखांत नमूद आहे. मात्र बहुतेक ठिकाणीं मंगळिवेड असें रूप आहे. ज्या देवाबद्दल दानें झालीं तो देव 'भंडिवण' मध्यें होता असें लेखांत आहे.

**लेखसार**– लेखामध्यें आरंभीं 'नमस्तुंग' हा श्लोक असून त्यापुढें १३ ओळींपर्यंत ज्या देवास दानें दिलीं आहेत त्या 'भंडिवण' मध्यें वास्तव्य करणाऱ्या भीमनाथ किंवा भीमेश्वर या स्वयंभू देवाची स्तुति केली आहे. हा स्तुतीचा भाग चांगलासा लागत नाहीं तरी विष्णु, ब्रह्मदेव, इंद्र, गंधर्व, विद्याधर, ऋषि, योगी, भोगी वगैरे याच्या पद्कमलाच्या ठिकाणीं रत असतात, हा भक्तजनांना इच्छिलेलें देतो, वगैरे अर्थाची स्तुती केल्याचें दिसत आहे. या स्तुतीनंतर १४ ते ३४ ओळींत पहिल्या दानाचें वर्णन आहे. त्यांत प्रथम समस्तभुवनाश्रय, पृथ्वीवल्लभ, महाराजाधिराज, परमेश्वर, इत्यादि सार्वभौमत्वदर्शक पण सामान्य विशेषणांनीं व परममाहेश्वर, काळांजरपुरवराधीश्वर, सुवर्णवृषभध्वज, डमरगेतूर्य्यनिर्घोषण, कळचुर्यकुळकमळमार्तंड, कळचुर्यकुळप्रतापचक्रवर्ति, रायमुरारि, इत्यादि कळचुर्यकुळासंबंधी व वैयक्तिक विशेषणांनीं सोयिदेव याची स्तुति करून तो मंगळवाड येथें

राज्य करीत असतां त्याचा चाकर महाप्रचंडदंडनायक (?) याच्या विनंती-वरून विजयसंवत्सरीं पौष शुद्ध द्वादशीला उत्तरायण संक्रमणाच्या पर्वकाळ-प्रसंगीं वरील देवाला त्याचे अंगरंगभोग व जीर्णोद्धार वगैरेसाठीं पाडेनाडा-मधील करजय गांवांतील दोन मत्तर जमीन दिल्याचें नमूद केलें आहे असें वाटतें. ३४ व्या ओळींत पुढील दानाला सुरवात करतांना प्रथम कळचुर्यकुळप्रतापचक्रवर्ति, निःशंकमल्ल या पदव्यांनीं युक्त असा सोयिदे-वाचा भाऊ संकमदेव हा राज्य करीत होता असें सांगून त्याच्या महाप्रधान महामंडळेश्वर वगैरे विशेषणांनीं युक्त अशा कोणी नारविगावे मधील जमीन दान दिल्याचें सांगितलें आहे. यापेक्षां जास्त माहिती लेख घाण झाला असल्यानें मिळूं शकत नाहीं.

---

## २० तेर येथील चार शिलालेख.*

( श्री. ग. ह. खरे )

तेर हें गांव बार्शीलाइट रेल्वेच्या कुर्डूवाडी–लातूर फाट्यावरील तेर या स्टेशनपासून पूर्वेस सुमारें २–२॥ मैल आहे. सध्यां हें गांव हैद्राबाद संस्थानापैकीं धाराशीव अथवा उस्मानाबाद जिल्ह्यांत मोडतें. हें सामान्य लोकांत गोरोबा कुंभार नांवाच्या संतकवीचें समाधिस्थान म्हणून प्रसिद्ध आहे. युरोपियन् विद्वानांत, टालेमीनें व परिप्लूसमध्यें उल्लेखिलेलें तगर म्हणजेच सध्यांचें तेर अशी समजूत आहे. पैकीं डॉ. फ्लीट यांनीं तगर म्हणजेच तेर हें सिद्ध करून दाखविलें[1] असून डॉ. बार्नेट यांनीं डॉ. फ्लीट

---

* पा. स. ४।१८५६

1 डॉ. फ्लीट यांनीं एके वेळीं कोल्हापूर किंवा त्याच्या जवळचें करवीर म्हणजेच तगर असें प्रतिपादन केलें होतें (बॉंबे गॅझिटियर १ ला व्हाल्यूम २ रा भाग पृ. ५४०). पण पुढें त्यांनीं आपलें हें मत बदलून वरील तेर म्हणजेच जुनें तगर असें ठरविण्याचा प्रयत्न एका लेखांत केला आहे. याचें आरंभीं तगर शहराविषयींचीं त्यावेळच्या विद्वा-नांमध्यें प्रचलित असलेलीं मतें देऊन तीं कशीं तर्काधिष्ठित नाहींत हें दाखविलें आहे आणि नंतर आपण तगर म्हणजेच तेर असें कां म्हणतों याचीं कारणें दिलीं आहेत. तीं अशी–( १ ) नगरचें ज्याप्रमाणें नेर किंवा क्वचित् नार होतें त्याप्रमाणें तगरचें (तगर → तयर → तेर या क्रमानें) तेर हें रूप होईल. ( २ ) हें गांव शहर

यांचा सिद्धांत बरोबर आहे असें मानलें आहे.[२] मि. कझिन्स व बर्जेस यांनीं डॉ. फ्लीट यांचा सिद्धांत बरोबर असल्याबद्दल जरी स्पष्ट विधान केलें नसलें तरी त्यांचे मतें हें गांव फार प्राचीन आहे.[३] हिंदी विद्वानांत कै. राजवाडे याखेरीज इतर विद्वानांनीं डॉ. फ्लीट यांचें मत गृहीत धरलें आहे.[४] कै. राजवाडे यांनीं मात्र पूर्वीचें तगर म्हणजे हल्लींचें, निजामच्या राज्यांतील कनकगिरीपासून उत्तरेस सहा, कोसांवर असलेलें तवरगिरी, तावरगेरे किंवा तवरेसर हें आहे असें सिद्ध करण्याचा यत्न केला आहे.[५] अगदीं अलीकडे निजामच्या राज्यांतील पुराणवस्तुसंशोधन-

---

म्हणूनच सर्वत्र समजण्यात आलें आहे. ( ३ ) पेरिप्लुसच्या म्हणण्याप्रमाणेंच भडोच ते पैठण व पैठण ते तेर हीं अंतरें आहेत. त्यानें सांगितलेली दिशाही जवळजवळ बरोबर आहे (J. R. A S. 1901P.537). हेंच मत त्यानीं पुढेंही सांगितलें आहे. पहा एपि. इंडि. ७,२२४;१२,२५३

२ पहा एपि. इंडि. १९,३१ आणि अँटिक्विटीज ऑफ इंडिया पृ.२६२

३ पहा ॲन्युअल रिपोर्ट ऑफ दि आर्किऑलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडिया १९०२–०३ पृ. १९६, प्रोग्रेस रिपोर्ट ऑफ दि आर्किऑलॉजिकल सर्व्हे ऑफ वेस्टर्न इंडिया इ. १९०१।१९०२ पृ. १ आणि J.R.A. S. 1902 P. २३०. या तिसऱ्या ठिकाणीं डॉ. बर्जेस यांनीं, कझिन्स यांनीं पुराणवस्तुसंशोधनाच्या दृष्टीनें तेर गांवचीं चार दिवस पहाणी केली असतां त्यांना काय माहिती किंवा वस्तू मिळाल्या याचें थोडक्यांत वर्णन दिलें आहे. त्याचें सार असें-( १ ) सत्यपुर ( म्हणजेच तगर ) महात्म्य ( प्रश्नाच्या दृष्टीनें निरुपयोगी ). ( २ ) श. १०७६ च्या एका लेखाचा छाप, फोटो व ओतीव प्रतिकृति. ( ३ ) एक बौद्ध चैत्य व तेर गांवाबाहेर पश्चिमेस असलेल्या अर्वाचीन जन देवालयांतील ४ बौद्ध शिल्पें. ( ४ ) दोन अतिशय जुनीं, विटांचीं व उत्तम कोरीव काम असलेलीं लाकडी दरवाजांचीं देवळें. ( ५ ) २५० वर्षांचा जुना व तेरच्या काझीचा उल्लेख असलेला एक फारसी ताम्रपट. ( ६ ) ५ नाणीं: ३ मुसलमानी, १ अस्पष्ट व १ अस्पष्ट पण आंध्र.

४ पहा McCrindle's Ancient India as described by Ptolemy and edited by S. N. Majumdar p. 385

५ पहा इतिहास आणि ऐतिहासिक वर्ष दुसरें अंक १५ वा पृ.२५७. या लेखांत कै. राजवाडे यांनीं श. ५३४ च्या हैद्राबाद ताम्रपटांत आलेल्या हकीकतीवरून तगर गांवाचा निश्चय करण्याचा प्रयत्न केला आहे. त्याचें तात्पर्य असें—ताम्रपट देणारा: वातापिनगरींत असणारा **चालुक्य दुसरा पुलकेशिन्.** दान घेणारा: **तगराधिवासी ज्येष्ठशर्मन्.** दान दिलेला गाव: **माकरप्पि.** उत्तरेस व दक्षिणेस असलेले गाव: **कवुप्प व रोल्कुरुकी.** यांत कै. राजवाडे पुढील अनुमानें काढतात.

खात्यामार्फत त्यांचे वार्षिक रिपोर्टांत तेर येथील एक फोटो प्रसिद्ध झाला आहे व एक परिच्छेद त्यासाठीं खर्चला आहे.[1] यापेक्षां जास्त प्रयत्न तगर शहराची निश्चिती ठरविण्यासाठीं झाल्याचें माझ्या पाहण्यांत नाहीं.

मला स्वतःला डॉ. फ्लीट यांचें म्हणणें जास्त पटलें. तसेंच डॉ. फ्लीट यांच्या लेखानंतर कझिन्स यांनीं या गांवाला प्रत्यक्ष जाऊन जी माहिती

---

( १ ) तगर वातापी ( =बदामी ) जवळ असलें पाहिजे. ( २ ) माकरप्पि हें गांव तगर शहरीं राहणाऱ्या ब्राह्मणाला चालवितां येईल इतकें तगर शहराजवळ असलें पाहिजे. ( ३ ) तगर वातापी व माकरप्पि यांच्या जवळ कोठें तरी असलें पाहिजे. ( ४ ) माकरप्पि हें गांव माकरब्बि या रूपानें हल्ली बल्लारि जिल्ह्यांतील हूविन हड गल्लि (=हडगल्ली?) तालुक्यांत विद्यमान आहे. (५) तेव्हां असें गांव म्हणजे तवरगिरी किंवा तावरगेरे हें होय; कारण हें बदामी पासून ३०।३५ कोस व माकरब्बि पासूनही तेवढेंच आहे. ( ६ ) या गांवाच्या आसपास शिलामय प्रदेश असल्यामुळे त्यास शिलाहार हें नांव देणें योग्य होतें. ( ७ ) म्हणून तगरहून निघालेल्यांनी शिलाहार हें नांव धारण करणें योग्य होतें. पण कै. राजवाडे यांच्या सिद्धांतावर अनेक आक्षेप घेतां येण्यासारखे आहेत. पहिला आक्षेप असा कीं, तगर व तवरगिरी–गेरे हीं दोन्हीं गांवें एक ठरविल्यास पेरिप्लूस व टॉलेमी यांच्या हकीकतीचा मेळ कसा घालावयाचा. त्यांनीं तगर हें गांव पैठणच्या पूर्वेस किंवा पूर्वोत्तरेस आहे म्हणून सांगितलें आहे आणि तवरगिरी तर पैठणच्या किती तरी दक्षिणेस आहे. दिशेचा प्रश्न बाजूस ठेवला तरी दोघेही तगर पैठणपासून दहा दिवसांच्या अंतरावर होतें असें म्हणतात. पैठण व तावरगेरे यामधील अंतर यापेक्षां कितीतरी जास्त आहे. दुसरा आक्षेप असा की, तवरगिरीस प्राचीन अवशेष आहेत काय ? ज्या गांवाचा व्यापारी शहर म्हणून परके लोकही उल्लेख करतात तेथें प्राचीन अवशेष खात्रीने सांपडावेत. पण कै. राजवाडे असे अवशेष असल्याचें दाखवूं शकले नाहींत. कांहीं शिलाहार जसे स्वतःस तगरपुराधिश्वर म्हणवितात तसे कांहीं स्वतःस कोपण पुरपरमेश्वर हें बिरुद घेतात. तेव्हां शिलाहार व तगर या दोन नांवाचा नसता संबंध जोडणें योग्य नव्हे. शिवाय शिलाहार हें जर देशवाची नांव असतें तर तें शेंकडोंनी उपलब्ध झालेल्या लेखांत कोठें तरी आलें असतें. असे अनेक आक्षेप कै. राजवाडे यांच्या विधानांवर घेतां येतील. सारांश काय कीं, प्रतिग्रही ब्राह्मण तगराधिवासी होता तेव्हां त्याला मिळालेलें गांवही तगराजवळच असावें येवढाच काय तो मुद्दा विचारणीय आहे.

१ पहा हैद्राबाद संस्थानच्या आर्किऑलॉजी खात्याचा रिपोर्ट इ.१९२९–३० पृ. ५ व चित्र

मिळविली व जी त्यांनीं आणि डॉ. बर्जेस यांनीं प्रसिद्ध केली तीवरून मला तेर येथें जाण्याची विशेष इच्छा उत्पन्न झाली व मी तेथें गेलों. तेथें मला चार शिलालेख मिळाले.[1] ते पुढें देत आहे. तत्पूर्वी येथें एक गोष्ट सांगून

१ मला या ठिकाणीं जे पुराण अवशेष आढळले ते असे-गांवांत त्रिविक्रमाच्या देवळांत म्हणजे ज्याला इतरांनीं त्याच्या शिल्पावरून बौद्ध चैत्य म्हटलें आहे त्यांत मुख्य मूर्ती त्रिविक्रमाची असून त्याशिवाय नारायण, बलिपत्नी इत्यादि मूर्ती आहेत. या सर्व मूर्ती भग्न आहेत. त्रिविक्रमाचा वरचा भाग शाबूत आहे. नारायणाची मूर्ती दोन तीन ठिकाणीं भंगलेली असली तरी दागिन्यांनीं खूप खचलेली आहे. त्याच्या गदेवर गरुडाची मूर्ती खोदलेली आहे. जिला बळीची बायको असें म्हणतात ती उभी व हातांत ओवाळण्यासाठीं ताम्हन वगैरे वस्तू घेतलेली असून ती ज्या भग्न सिंहासनावर उभी आहे त्याच्याच दर्शनी पट्टीवर कानडी लेख आहे. या सर्व मूर्ती देवळाच्या अगदीं आंतल्या दालनांत आहेत. बाहेरच्या दालनांत समोरच नग्न भैरव असून त्याच्या डावीकडे कार्तिकस्वामी आहे. भैरवाचे खालचे दोन्ही हात तुटलेले असून वरच्या दोन हातांत डमरू व त्रिशूल हीं आयुधें आहेत. कार्तिकस्वामी मोरावर बसलेला असून त्याच्या तीन हातांत तलवार ? खड्ग, ढाल हीं आयुधें आहेत व चौथा हात कमरेवर आहे. तोंड एकच आहे. बाहेरच्या दालनापुढें लाकडी मंडप आहे. दरवाजाही लाकडी आहे. दरवाजाच्या समोर कांहीं वीरगळ व मूर्ती भिंतीच्या कट्ट्यांत बसविलेल्या आहेत. मूर्ती इतक्या महत्वाच्या नाहींत. वीरगळांत दोनच दालनें आहेत. कीं पहिल्यांत लढाईचें दृश्य व दुसऱ्यात मृतवीर कैलासांत शिवपूजा करित असल्याचा देखावा असा क्रम आहे. या देवळाच्या सभोंवतीं पूर्वी ओवऱ्या व इतर बांधकाम असावें असें वाटतें. सध्यां सभोंवतीं जोतें, खांबांचे तळखडे इत्यादि अवशेष दिसतात. गांवांतील दुसरें महत्वाचें देवालय म्हणजे उत्तरेश्वराचें. हें देऊळ विटांचें बांधलेलें आहे. त्याचा दरवाजा लाकडी असून त्यावरील नक्षीकाम व शिल्पकाम अतिशय सुंदर आहे. पण कोणाचें लक्ष नसल्यामुळें सध्यां हें देऊळ जमिनींत अर्धवट गाडलें गेलें आहे. या देवळाजवळच मध्यें कमळ व भोंवतीं बारा राशी काढलेला दगड पडला आहे. याशिवाय दोन भग्न सूर्यमूर्तीही आहेत. दोन्ही उभ्याच आहेत. प्रत्येक मूर्तीच्या दोन्ही बाजूंस एक एक स्त्री उभी असून एकीच्या दोन्ही हातांत कमळें पण खालचा भाग अस्पष्ट झालेला व दुसरीचे दोन्ही हात अस्पष्ट असून खालीं घोड्यांचीं सात तोंडें आहेत. घोड्याची सात तोंडें किंवा कमळ यावरून त्या मूर्ती सूर्याच्या आहेत हें स्पष्ट आहे. गांवाबाहेर पश्चिमेस नागठाण व पार्श्वनाथ बस्ती अशीं दोन जैन स्थानें आहेत. नागठाण म्हणजे एक चौकोनी, दुदालनी दगडी देऊळ आहे. आंतल्या दालनांत भिंतींत समोरच चैत्य व त्यावर नागवृक्ष काढलेली एक शिला बसविलेली आहे; नागवृक्षास फांद्या, पानें वगैरे ऐवजीं नाग व त्याचे फणेच काढलेले आहेत. चैत्याच्या

ठेवतों कीं, माझ्या कोणत्याही लेखांत तेर या गांवाचें नांव तगर या रूपांत आलेलें नाहीं. पण त्या बरोबरच हेंही सांगून ठेवण्यास हरकत नाहीं कीं, तेर येथें मुसलमानपूर्वकालीन अवशेष फार मोठ्या प्रमाणांत अस्ताव्यस्त पडलेले किंवा गाडले गेलेले असून उत्खनन केल्यास फार महत्त्वाची माहिती उपलब्ध होण्याचा संभव आहे.

१

**उपलब्धि व वर्णन**—हा लेख त्रिविक्रमाच्या देवळांत गाभाऱ्यांत असलेल्या एका भग्न, घोटींव, काळ्या दगडाच्या सिंहासनाच्या दर्शनी पट्टीवर खोदलेला आहे. सिंहासनाप्रमाणें लेखही थोडा फुटलेला आहे. लेखाची लांबी १–१″ व रुंदी ११″ आहे. ओळी दोन आहेत, पण दुसरी अर्धीच आहे.

**अक्षरवटिका, लेखनपद्धति व भाषा**—अक्षरांचें स्वरूप शकाच्या अकराव्या शतकांतील कानडी अक्षरांशीं जुळणारें आहे. लेखनपद्धतीविषयीं कांहीं सांगण्यासारखें नाहीं. भाषा कानडी आहे.

---

दोन्ही बाजूंस प्रत्येकीं दोन भक्त काढले आहेत. शिवाय मध्यभागीं व बाजूस बहुधा पार्श्वनाथ तीर्थंकरांच्या मूर्ती आहेत. नागठाण सोडून पार्श्वनाथ बस्तींत गेलें म्हणजे एक चार दालनी इमारत लागते. तिच्या अगदीं बाहेरच्या दालनांत उत्तर व दक्षिण बाजूंच्या भिंतींत समोरासमोर बैठ्या तीर्थंकर मूर्ती आहेत. पैकीं दक्षिणेकडील पार्श्वनाथ आहे. उत्तरेकडील कोण हें लांछन काढलेलें नसल्यानें समजत नाही. आंतल्या दालनांत उजव्या व डाव्या बाजूस प्रत्येकीं एक खोली आहे. त्यांपैकीं उजवीकडच्या खोलीत एक उभी पार्श्वनाथ मूर्ती असून बाजूंस तिच्या भग्न सिंहासनावर एक लेख आहे. हें सिंहासन मूळ या मूर्तीचें दिसत नाहीं. अगदीं शेवटच्या दालनांत उंच सिंहासनावर तीर्थंकरांची बैठी मूर्ती व एक एक चौरीधर आहे. सिंहासनावर काढलेल्या सिंह लांछनावरून ती मूर्ती चोविसावा तीर्थंकर वर्धमान किंवा महावीर याची आहे हें स्पष्ट होतें. याशिवाय मुख्य इमारतीच्या आग्नेय कोपऱ्यांत एक खोली असून तीन तीर्थंकर मूर्ती आहेत. तेर हें गांव व हा बस्ती यांच्या मध्यें एक हेमाडपंती थाटाचें नवरंगी शिवालय आहे. हें शिवालय, बस्ती व त्रिविक्रमाचें मंदिर या तिहींविषयीं एक गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे ती ही कीं, यांपैकीं कोणालाही शिखर नसून द्राविडी शिखरावर ज्याप्रमाणें शेवटीं एकाद्या कवरीच्या दगडासारखा भाग असतो तशा आकाराचा भाग आहे. असें इतरत्र फारसें कोठें आढळत नाहीं. गांवाबाहेर कनक भावी नांवाची एक विहीर आहे. भावी हा वापी शब्दाचा कानडी भाषेंत रूढ असलेला अपभ्रंश दिसतो. मराठींत बाव, बावडी असा अपभ्रंश होतो.

**काल व स्थल**—यांत कालाचा उल्लेख नाहीं; पण पुढें केलेल्या चर्चे-वरून तो श. १००० च्या आसपासचा आहे असें दिसतें. वारिस्तळे असा एका स्थानाचा उल्लेख आला आहे. तें कोठें आहे हें सध्यां समजत नाहीं.

**चर्चा**—या लेखांत महामंडळेश्वर जोगमरस या नांवाची एक व्यक्ति आली आहे. जोगमरसाचा उल्लेख दोन तीन ठिकाणीं आला आहे. हैद्राबाद् संस्थानांतील हिरे मुद्नूर येथील लेखांत याविषयीं महामण्डलेश्वर जोगमरस अथवा जोगमराण, सूर्यवंशी, दरिकाडु नाडाचा मालक व मंगळ-वाडाचा मंडळेश्वर, बायको तारादेवी, मुलगी सावळदेवी (हीच चालुक्य सहावा विक्रम याची बायको असून ती श. १००० च्या सुमारास नव-ऱ्यानें अंगभोगासाठीं दिलेल्या नारेगल प्रांतावर अधिकार चालवींत होती) अशी माहिती आली आहे.[1] माडगीहाळ शिलालेखांत कुंतळ देशांत तरिकाडु (=दरिकाडु) नाड असून त्यांत मंगळिवेड (=मंगळवेड=मंगळ-वेढें) हें गांव आहे असें सांगून नंतर कल्याणीच्या कळचुर्यांची वंशावळ दिली आहे. तींत जोगम हा बिज्जलाचा आजा म्हणून सांगितला असून ती गोष्ट इतर प्रामाणिक लेखांशीं जुळणारी आहे.[2] एपिग्राफिया कर्नाटिका मध्येंही तलिकाड जोगमनृप असा एक उल्लेख आला आहे.[3] हे सर्व उल्लेख कळचुर्य जोगमाविषयींच आहेत असें डॉ. बार्नेट यांचें म्हणणें असून तें मान्य करण्यासारखें आहे.[4] या लेखांतील जोगमरसही कळचुर्य जोगमच असावा. मात्र येथें एक शंका येते. हिरे मुद्नूर लेखांत जोगमाला सूर्यवंशी म्हटलें आहे आणि कळचुर्य कुळ तर सोमवंशी म्हटलें जातें.[5] तेव्हां सूर्यवंशी जोगम व सोमवंशी जोगम एक कसे मानावयाचे? पण हा प्रश्न सोडविणें कठीण नाहीं. आपण पाहिलेंच आहे कीं, एकच चालुक्य कुल सूर्य व सोम अशा दोन्ही वंशांतील सांगितलें आहे.[6] तेव्हां येथें तसें होणें अशक्य नाहीं. कोल्हापूर ताम्रपटांत 'सूर्यान्वयांबररविस्सच बिज्जणोपि चक्रे गृहं

१ बॉंबे गॅझिटियर व्हॉ. १ भाग २ पृ. ४४८ व टीपा ३,४.

२ एपि. इंडि. १५,३१९. ३ एपि. कर्ना. व्हॉ. ११ Dg42 (पृ ८८)

४ एपि. इंडि. १५,३१८ टीप ३ री. ५ बॉंबे गॅझिटियर व्हॉ. १ भाग २ पृ. ४६८ ६ पाठीमागें पृ. ४१.

सुरपतिर्भुवि यस्य कोपात्' असें विधान आहे.[1] यांतील बिज्जण कांहीं लेखांत सांगितल्याप्रमाणें जोगमाचा बाप मानला तर हें कुल सूर्यवंशी होतें असें ठरेल. कोल्हापूर ताम्रपट श. १०३७चा असल्यानें जुनी कल्पना काय होती हेंही समजतें. ज्या भोजाविषयीं वरील विधान आलें आहे त्यानें माझे मतें श. ९९० पासून पराक्रमास सुरवात केली असल्यानें कालाच्या दृष्टीनें जोगमाचा बाप बिज्जल व भोज हे एका कालीं येऊं शकतात.

दक्षिणेंतील अनेक लेखांतून अनकोज, कालकोज, केदारोज, दासोज, देमोज, देवोज, नागोज, मल्लोज, माचोज, मुद्दोज, हरोज अशा तऱ्हेचीं शिल्प्यांचीं नांवें येतात.[2] तेव्हां वारिमल्लोज, हें शिल्प्याचें नांव आहे हें उघड ठरतें.

## वाचन[3]

( १ ) श्रीमत् महामण्डळेस्वर जोगमरसर विद्यामन्तरू वारिमल्लोजर पुत्र बिरुदरू वारिस्तळेय कालभैरवरू[4] [5]– – –

( २ ) न बेस मंगळ महाश्री ॥ ९[6]

## अर्थ

श्रीमंत महामंडळेश्वर जोगमरसाच्या विद्यावंत, वारिमल्लोजाचा पुत्र ( हें ) बिरूद असलेल्या वारिस्थळीच्या कालभैरवाची कृति मंगल महाश्री

## २

**उपलब्धि:**–हा लेख तेर येथें गांवाच्या पूर्वेस नदीच्या जवळच असलेल्या मारुतीच्या चौकोनी पाराच्या पश्चिम बाजूस टेकून ठेवलेला आहे.

**वर्णन:**–या लेखाची लांबी ४′–३″, रुंदी १′ ते १′–१॥″ व जाडी अदमासें १′ आहे. या दगडाच्या पहिल्या १′–२॥″ जागेंत डावीकडून

१ दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाची साधनें खंड १ ला पृ. ३८ ओळी २०, २१. २ ए डिक्शनरी ऑफ हिंदू आर्किटेक्चर परिशिष्ट २.
३ वाचन प्रत्यक्ष पाहून व ठशावरून केलें आहे. ४ या अक्षराविषयीं शंका आहे. ५ येथून पुढील तीन अक्षरांचे खालचे भागच फक्त दिसत आहेत.
६ ९ या आकड्यासारखें चिन्ह आहे.

उजवीकडे सन्मुख ब्रह्मदेव व शिवलिंग असून त्यांच्यावर सूर्यचंद्र आहेत. खालीं लेख सुरू होतो. पण तो इतका अस्पष्ट आहे कीं, शेवटच्या ९ ओळीखेरीज बाकीच्या मजकुरांतील दहापांचापेक्षां जास्त अक्षरें लागत नाहींत. तेव्हां पुढील माहिती ही शेवटच्या भागाविषयीं आहे असें समजावें.[1]

**अक्षरवटिका:-** अक्षरांचें स्वरूप शकाच्या अकराव्या शतकांतील नागरी अक्षरवटिकेशीं जुळणारें आहे. **लेखनपद्धतीविषयीं** विशेष सांगण्यासारखें नाहीं. भाषा जुनी मराठी आहे

**स्थल**–या लेखांत गांवाचें नांव आलेलें नाहीं.

**काल**–यांत कालाचा उल्लेख शक १०८६, सभानु संवत्सर, गुरुवार, वैशाख शुद्ध त्रयोदशी असा आला आहे. चालू शक १०८६ ला जुळता संवत्सर सुभानु येतो. तेव्हां येथील उल्लेख चालू शकाचा धरला पाहिजे. चालू श. १०८६ च्या वैशाख शुद्ध त्रयोदशीस गुरुवार येत असून त्या दिवशीं त्रयोदशी मध्यममानानें ४३ घटका ४८ पळें होती. या मितीशीं जुळती ख्रिस्ती तारीख इ. स. ११६३ एप्रिल १८ ही येते.[2]

**चर्चा**–हा लेख मराठी आहे यांतच महत्त्व आहे. यांतील भुमिं, चालीसां निवर्तनां, मले, तीनि, तेयां, देववित्यासिए, वहिला, नीतणें, मान्यें त(स)लटीचीं, इत्यादि शब्दरूपें ध्यानांत ठेवण्यासारखीं आहेत.

**सार**–या लेखांत आरंभीं महत्वाची माहिती आली असली पाहिजे हें उघड आहे. पण तो भाग लागत नसल्यानें फुकट गेला आहे. जो भाग लागतो त्यांत पुण्यस्थानाच्या उद्यापनसमयीं दिलेल्या दानांचा तपशील आहे.

---

१ या लेखाचे बाबतीत मि. कझिन्सनीं पुढील मत दिलें आहे ' Beside the platform stands a slab containing a long but much abraded inscription with a date which is hardly legible (Annual Report of the archaeological survey of India 1902-03 p. 196 )

२ डॉ. बर्जेस यांनीं याचा काल शक १०७६ असा दिला आहे. पण तो चूक दिसतो.

## वाचन[1]

( १ ) स्वस्ति श्री शकु १०८६ ।।। सुभानु संवत्सरांतर्गत वैसाख

( २ ) शुद्ध त्रयोदश्यां गुरौ पुण्यस्थान तदूद्यापन समयु स

( ३ ) मागता स—ते महाजन स्वरसप्रत्त देसास भुमिं

( ४ ) चालीसां निवर्त्तनां त्रिस्रोत्रमान्य । क्रयगृहीत म

( ५ ) ले तीनि च तेयां देववित्यासिए ।। वहिला महाजे

( ६ ) न स्थलिं निवेद्या तिस्तालिवणा नीतणें ४ मा

( ७ ) न्यें ।। त(स?)ळटीचीं नीतणे २(३?) ३ मान्ये । स्वदत्तां परदत्तां वा

( ८ ) यो हरेत वसुंधरां । षष्ठिं वर्षसहस्राणि विष्ठायां जायते कृ

( ९ ) मिः।

### ३

**उपलब्धि**—हा लेख तेर गांवच्या पश्चिमेस असलेल्या जिन बस्तींतिल एका पार्श्वनाथमूर्तीच्या सिंहासनावर कोरलेला आहे. लेख कोरण्याची पद्धति व त्यांतील मजकूर यांचा विचार करतां लेख असलेलें सिंहासन हल्लींच्या पार्श्वनाथमूर्तीचें नसावें हें निश्चित ठरतें.

**वर्णन**—लेखाची लांबी २′ १″ आणि १′ १″ व रुंदी १० ″ आहे. म्हणजे त्याचा आकार (आकृति) असा आहे. लेखाच्या ओळी ६ आहेत. पैकीं शेवटच्या ओळीचीं अक्षरें अगदीं लहान आहेत. लेख मध्येंच फुटला आहे व पार्श्वनाथाची मूर्ती बसवितांना तिच्या पायाखालीं घातलेल्या चुन्यानें भरून गेला आहे. तो चुना खरवडून काढला तरीही अक्षरांत चुना जाऊन बसल्यानें व लेखाचा कांहीं भाग मूर्तीच्या जवळजवळ पायाखालीं गेल्यानें त्याचा छाप चांगला येत नाहीं.

**अक्षरवटिका, लेखनपद्धति, भाषा**—अक्षरांचें स्वरूप १३।१४ व्या शतकांतील नागरी असून त्यांतील दोन विशेष म्हणजे श्रीवर कांहीं ठिकाणीं मात्रा आहेत व कांहीं ठिकाणीं पृष्ठमात्रा आहेत ( स्वस्ति श्री ओ. १, श्रीमूल ओ. २, बुधवारे ओ. १ ). शिष्य ऐवजीं सिष्य ( ओ. ४ ) लिहिलें आहे.

---

१ वाचन मूळ व ठसा या दोहोंच्या सहाय्यानें केलें आहे.

**काल**–यांतील कालाचा उल्लेख श. १३१३ [ प्रजापति ] संवत्सर, फाल्गुन वद्य ११ बुधवार असा असून तो पिल्ले जंत्रीप्रमाणें बरोबर येतो. या जंत्रीप्रमाणें श. १३१३ फाल्गुन वद्य ११ मंगळवार व बुधवार या दोन दिवशीं येत असून बुधवारीं अगदीं थोडी आहे. त्या दिवशींची खिस्ती तारीख स. १३९२ मार्च २० ही येते.

**स्थल**–लेखांत स्थलाचा उल्लेख नाहीं.

**चर्चा**–वर्धमानस्वामीच्या चैत्यालयाचा जीर्णोद्धार केल्यावेळीं आलेल्या एका गृहस्थांनीं दान दिलेल्या पादुकासंबंधीं हा लेख आहे. अर्थात् श. १३१३ पूर्वीं तेथें जुनें, वर्धमान म्हणजेच महावीर याचें देऊळ होतें हें स्पष्ट झालें. मि. कझिन्स यांना हा जैनबस्ती अर्वाचीन वाटला तें बरोबर नाहीं, असें यावरून सिद्ध होतें.

## वाचन[1]

( १ ) ॥ स्वस्ति श्री शाके १३१३ [ प्रजापति ] संवस्छरे फाल्गुन वदि ११ बुधवारे ॥

( २ ) ॥ श्री मूलसंघीय श्री [ वर्धमान ] स्वामि चैत्यालयकृत जीर्ण्णो ॥

( ३ ) ॥ द्धारे समायात सिद्धांताचार्य श्रीमत्पूज्यपादस्वामिनां प्रिय ॥

( ४ ) ॥ सिष्य श्रीविद्यानंद स्वामिनां संजा

( ५ ) ॥ता–गा [ धि ]– स्येयं पादुका ॥ श्री ॥

( ६ ) ॥ …….. दालासुतस्य न–स्व ( स्य ) ॥

## ४

**उपलब्धि**–हा, तिसरा लेख ज्या बस्तींत सांपडला त्याच बस्तीच्या पुढील सोप्यांत पडलेला आढळला.

**वर्णन**–हा लेख संपूर्ण नाहीं. पण जो भाग सांपडला आहे त्याची लांबी व रुंदी, अनुक्रमें २′–३″ व १′–८″ असून आरंभीं, डाव्या बाजूस व उजव्या बाजूस अनुक्रमें ४,″ २,″ २″ इंच जागा मोकळी सोडून मधल्या जागेंत लेख आहे. लेख जसा फुटला आहे तसा अस्पष्टही झाला आहे. त्यामुळें नीट लागत नाहीं. यांत एकंदर ओळी २० आहेत.

---

१ वाचन मूळ लेख पाहून व ठशांच्या सहाय्यानें केलें आहे.

**अक्षरवटिका,**—लेख नागरी लिपींत आहे यापेक्षां जास्त कांहीं सांगतां येत नाहीं.

**काल**—लेखांत कालाचा उल्लेख शक १५२० विलंबी संवत्सर भाद्रपद मास, शुक्लपक्ष, पंचमी, शनिवार असा आहे. गत शक १५२० ला विलंबी संवत्सर व भाद्रपद शुद्ध पंचमीला शनिवारही येतो. या मितीशीं जुळती खिस्ती तारीख इ. स. १५९८ आगस्ट २६ ही आहे.

**स्थल**—लेखांत तैर किंवा तेर येवढें एकच ग्रामनाम आलें आहे. तैर हें रूप तगर → तयर → तैर असें साधतां येईल व तें तगर या रूपाशीं तेर या रूपापेक्षां जास्त जवळचें आहे.

**सार**—या लेखांत आरंभीं ' श्रीमत्परमगंभीरस्याद्वादामोघलांछनं। जीयात्त्रैलोक्यनाथस्य शासनं जिनशासनं ' हा श्लोक थोड्या अशुद्ध रूपांत आला असून पुढें मितीचा तपशील आला आहे. पुढील भाग अगदींच अस्पष्ट आहे. पण त्यांत तैर किंवा तेर हें गांवाचें नांव व वर्धमान आणि पार्श्वनाथ यांच्या चैत्यालयांचा मात्र निश्चित उल्लेख आहे.

---

# २१ लातूर येथील दोन शिलालेख*

( श्री. ग. ह. खरे. )

लातूर हें गांव निजामच्या राज्यांतील उस्मानाबाद जिल्ह्यापैकीं लातूर तालुक्याचें मुख्य ठिकाण असून बार्शी लाइट रेल्वेच्या कुर्डुवाडी–लातूर फाट्यावरील मुख्य ठिकाण आहे. मी या ठिकाणीं गेलों असतां मला जे दोन लेख मिळाले ते पुढें देत आहे. पैकीं पहिला फार महत्त्वाचा आहे.

१

**उपलब्धिः**—हा लेख गांवाच्या दक्षिण अंगास भूतनाथाचें म्हणून एक देऊळ असून त्याच्या मंडपांत, गाभाऱ्यांत शिरतांना, डाव्या अंगास, गाभारा व मंडप यांस दुभागणाऱ्या भिंतीपाशीं अर्धवट पुरलेला असा आढळला.

**वर्णनः**—हा लेख ज्या दगडावर कोरला आहे त्याची लांबी, रुंदी, जाडी, २' ५", १' व १०" असून त्याच्या तीन बाजूंवर लेख आहे व चौथ्या बाजूवर चित्रें काढलीं आहेत. लांबीपैकीं वरचा ५" भाग चोहों-

---

* पा. स. ४।१८५६

बाजूंनीं निमुळता केला आहे. तेव्हां त्यावर लेख नाहीं हें उघड आ...
तीन बाजूंवर जरी लेख आहे तरी त्यावर लोकांनीं पाणी ओतल्यामुळें तो इतका खराब झाला आहे कीं, त्याची आरंभींची बाजूच फक्त कांहींशी लागत आहे. पण तीवरूनही बरीच महत्त्वाची माहिती उपलब्ध होत आहे.

**अक्षरवटिका, लेखनपद्धति, भाषा:**-अक्षरांचें स्वरूप शकाच्या अकराव्या शतकांतील नागरी अक्षरांशीं जुळणारें आहे. पृष्ठमात्रा वापरलेली दिसत नाहीं. न् बद्दल अनुस्वार ( तस्मिं ओ. ७ ) वापरला आहे. कांहीं ठिकाणीं श बद्दल स वापरला आहे ( विस्रुत ओ. ३, पुरस्रेष्ठ ओ. १२ ). भाषा संस्कृत आहे.

**काल:**--या लेखांत कालाचा उल्लेख अक्षरीं व आकड्यांनीं अशा दोन्ही तऱ्हांनीं आला आहे. दोन्ही उल्लेख दुसऱ्या बाजूवर आहेत (ओ. ७-११). उल्लेख असे-'शक नृपकालात् एकोनपंचाशदुत्तरे वत्सरसहस्रे अतीते १०४९॥ प्लवंग संवत्सरे फाल्गुने मासि शुक्लाष्टम्यां सुक्रवारे ' दक्षिणी पद्धती-प्रमाणें गत श. १०४९॥ ला प्लवंग संवत्सर येतो व फाल्गुन शुद्ध अष्टमीला शुक्रवारही येतो. याशीं जुळती ख्रिस्ती तारीख इ. ११२८ फेब्रुवारी १० ही येते.

**स्थल:**--या लेखांत लत्तलौर असें एकच स्थलनाम आलें असून त्याविषयीं विवेचन पुढें आलें आहे.

**चर्चा**- या लेखांत कल्याणी येथील चालुक्यांच्या, आहवमल्ल, त्याचा मुलगा परमर्दि व त्याचा मुलगा भूलोकमल्ल अशा तीन पिढ्या दिल्या असून त्या इतर प्रामाणिक लेखांशीं जुळणाऱ्या अशाच आहेत. मात्र येथें एक गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे कीं, आहवमल्ल, परमर्दि व भूलोक-मल्ल हीं नांवें नसून, पहिला सोमेश्वर, त्याचा मुलगा सहावा विक्रमादित्य व त्याचा मुलगा तिसरा सोमेश्वर यांचीं बिरुदें आहेत[1]. तिसरा सोमेश्वर श. १०४८ मध्यें गादीवर बसला असें त्याच्या लेखांवरून म्हणता येतें[2] यामुळें बिरुदें किंवा तारीख यांत वैशिष्ट्य नाहीं. पण हा लेख एका निराळ्याच कारणानें महत्त्वाचा ठरला असल्यानें त्याचें विवेचन येथें करणें जरूर आहे

---

१ पहा बॉंबे गॅझिटियर व्हॉ. १ भाग २ पृ. ४२८, समोरील वंशावळ पृ. ४३८, ४४६ व ४५५

२ किता पृ. ४५५ व हिस्टॉरिकल इन्स्क्रिप्शन्स इन साउथ इंडिया पृ.

दक्षिणेंतील अनेक कुलांतील राजपुरुषांनीं स्वतःच्या मूलस्थानाचें वर्शक असें एक बिरुद् आपल्या नांवाबरोबर लाऊन घेतलेलें दिसतें. उदाहरणार्थ शिलाहार स्वतःस तगरपुरवराधीश्वर असें, कदंब वनवासी पुरवराधीश्वर असें किंवा कल्याणीचें कळचुर्य स्वतःस कालांजन-जर किंवा कालंजरपुराधीश्वर असें म्हणवीत. त्याचप्रमाणें मालखेडच्या राष्ट्रकूट वंशांतील पहिला अमोघवर्ष यानें आणि सौंदत्तीच्या कांहीं रट्ट राजांनीं स्वतःस लत्तलूरपुरपरमेश्वर, लत्तलूरपुरवरेश्वर, लत्तलूरपुरवराधीश्वर इत्यादि प्रकारचें एक बिरुद् लावून घेतलेलें आढळतें. या बिरुदाचा अर्थ लत्तलूर हें मूलस्थानें असलेले अथवा लत्तलूरपुराहून निघून आलेले असा करावा लागतो हें सिताबल्दी येथील लेखावरून स्पष्ट होत आहे. त्यांत धाडिभडक अथवा धाडिभंडक या नांवाच्या मोठ्या राष्ट्रकूट वंशांतील राजाला व त्याचा अधिकारी वासुदेव याला लतलौरविनिर्गत हें विशेषण लावलें आहे.

निरनिराळ्या लेखांतून या गांवाचे नांव निरनिराळ्या रूपांत आलें आहे. निळगुंद[१] व शिरूर[२] या लेखांत याचें लत्तलूर असें रूप सांपडतें तर मंटूर[३] व इट्टगी[४] लेख आणि सौंदत्ती[५] येथील दोन लेख यांत लत्तलूर् असें रूप येतें. तेरदळ[६] लेखांत याचें लत्तनूर असें रूप आलेलें दिसतें तर कल्होळें[७] येथील लेख, भोज येथील ताम्रपत्र[८] व सौंदत्तीचा[९] आणखी एक लेख यांत याचें लत्तनूर् असें रूप येतें. आणि सितावल्दी[१०] लेखांत तर याचें लतलौर असें रूप आलें आहे.

हें गांव कोठें असावें याविषयीं निरनिराळ्या विद्वानांनीं निरनिराळे तर्क केले आहेत. पैकीं दोनच येथें नमूद करण्यासारखे आहेत.[११] डॉ.फ्लीट यांनीं एक वेळ असें सुचविलें होतें कीं, मध्यप्रांतापैकीं बिलासपूर जिल्ह्यांतील रतनपूर म्हणजेच लत्तनूर असणें शक्य आहे. कारण ल व र यांची अदलाबदल

---

१ एपि. इंडि ६,१०३. २ इंडि. अँटि. १२,२१८. ३ इंडि.अँटि. १९,१६४. ४ एपि. इंडि. १३,४७ ५ जे. बी. बी.आर्. ए. एस्. १०,२१३ व १९६. ६ इंडि. अँटि. १४, १८. ७ जे. बी. बी. आर्. ए. एस् १८; २२१. ८ इंडि. अँटि. १९, २४७. ९ जे. बी. बी. आर्. ए. एस्. १०; २६८. १० एपि. इंडि. ९,३०६. ११ बाकीच्या करितां पहा एपि.इंडि.७,२२५ टीप ४ आणि गोयकारांची गोयांभायली वसणूक पैलें खंड पृ. ३४, ३५.

होत असल्यानें लत्तनूरपूर या शब्दापासून रतनपूर व्युत्पादणें अवघड नाहीं.[1] पण पुढें त्यांनीं, वरील तर्क अप्रतिष्ठित वाटल्यामुळें सोडून दिला[2] आणि नवीनच तर्क पुढें मांडला. त्यांत त्यांनीं असें सांगितलें कीं, मला लत्तलूर विषयीं जरी कायमचा निकाल लावतां येत नसला तरी लातूर या गांवीं शोध घेतला असतां त्याचा परिणाम लातूर म्हणजेच लत्तलूर अशी माहिती मिळण्यांत होईल असा मला पक्का भरंवसा आहे.[3] पण या सूचनेकडे कोणीही लक्ष दिलें नाहीं व वरील प्रश्न तसाच राहिला.[4]

अलीकडे शणै गोयबाव श्री. वा. र. वर्दे वालावलकर यांनीं असें सुचविलें आहे कीं, पोर्तुगीज हिंदुस्थानांतील (गोवे प्रांतांतील) साष्टी महालांतील लोटली हें गांव म्हणजेच पूर्वीचें लत्तलूर होय. या विधानाला त्यांचा पुरावा म्हणजे लोटलीस प्राचीन अवशेष पुष्कळ सांपडतात येवढाच[5]. यापेक्षां जास्त पुरावा देण्याची त्यांनीं खटपट केली नाहीं येवढेंच नव्हे तर डॉ. फ्लीट यांचें हें नवीन मत खोडूनही काढलें नाहीं. उलट जें मत डॉ. फ्लीट यांनीं स्वतःच सोडून दिलें तें मात्र कसें चुकीचें आहे हें दाखविण्याचा प्रयत्न केला.[6] त्यावरून येवढें मात्र दिसतें कीं, श्री. वर्दे यांना डॉ. फ्लीट यांचें नवीन मत ठाऊक नसावें.

---

१ एपि. इंडि. ७,२२५

२ याचें सयुक्तिक कारण डॉ. फ्लीट यांनीं कोठेंही सांगितलें नसलें तरी त्यांनीं तसें कां केलें असावें हें श्री. वर्दे यांनीं स्पष्ट केलें आहे. तें असें—ज्या लेखांत रतनपुराचा उल्लेख आला आहे त्यांतच असें सांगितलें आहे कीं, जाजल्लदेवाचा आजा रत्नराज किंवा रत्नेश्वर यानें हें शहर वसविलें. या लेखाचा काल जाजल्लदेवाच्या कारकीर्दीतील म्हणजे इ. स. १११४ हा आहे. दर पिढीला २५ वर्षें हा काल दिला तरी जाजल्लदेवाचा आजा जो रत्नराज त्याचा काल इ. स. १०६४ च्या सुमाराचा येईल व या वेळीं रतनपुराची स्थापना झाली असें ठरेल. पण लत्तलूराचा पहिला उल्लेख तर यापूर्वीं सुमारें २०० वर्षें म्हणजे श. ७८८ (इ. स. ८६६) चा आढळतो. अर्थात् लत्तलूर रतनपुराच्या अगोदर दोनशें वर्षें तरी अस्तित्वांत होतें. तेव्हां या दोन शहरांचें ऐक्य दाखवितां येणार नाहीं (गोयकारांची गोयाभायली वसणूक पैलें खंड पृ. ३६) ३ एपि. इंडि. ७, २२६.

४ डॉ. बार्नेट यांनीं दोन ठिकाणीं डॉ. फ्लीट यांचा तर्कच प्रमाण मानला आहे (पहा एपि. इंडि. १३, ४१ व ॲंटिक्विटीज ऑफ इंडिया पृ.२६२).

५ गोयकारांची गोयाभायली वसणूक पैलें खंड पृ.३६.३७. ६ किंवा पृ.३६

नंतर मी महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या ४ थ्या खंडांत (पृ.२६५) या संबंधीं एक लेख लिहिला. त्यांत श्री. वर्दे यांचें वरील मत कसें सुप्रतिष्ठित नाहीं हें दाखवून माझ्या मतें योग्य असलेली लत्तनूर या शब्दाची व्युत्पत्ति दिली व तीवरून तें गांव राष्ट्रकूटांचें मूळ गांव कसें होऊं शकतें हें सांगितलें आहे. व्युत्पत्तीबाबत माझें तेथील विवेचन अगदींच सूत्ररूप असल्यानें तेंच म्हणणें थोडेसें वाढवून पुन्हा येथें मांडतों. लत्तनूर याचें मूळ रूप रट्टनूरु किंवा रट्टरूरु असें असावें. या दोन शब्दांचे विग्रह रट्टन + ऊरु आणि रट्टर + ऊरु असे आहेत. हे दोन्ही शब्द कानडी असून त्यांचा अर्थ अनुक्रमें रट्टाचें गांव आणि रट्टांचें गांव असा होईल. दोहोंत फरक येवढाच कीं, रट्टन हें रट्ट शब्दाचें षष्ठीचें एकवचन आहे, तर रट्टर हें त्याच शब्दाचें, त्याच विभक्तींतील अनेकवचन आहे. रट्टनूरु शब्दापासून लत्तनूरु व रट्टरूरु शब्दापासून लत्तलूरु असे अपभ्रंश होऊन नंतर लत्तनूर व लत्तलूर हीं साधीं रूपें झालीं असें म्हणावयास हरकत नाहीं. किंवा लत्तनूर शब्दापासूनच न चा ल होऊन लत्तलूर हें रूप बनलें अथवा लत्तलूर यामध्येंच ल चा न होऊन लत्तनूर हें रूप झालें असाही युक्तिवाद करतां येईल व तोही अपभ्रंशाच्या नियमांना धरूनच आहे. तात्पर्य माझ्या मतें लत्तनूर किंवा लत्तलूर हें ग्रामनाम कानडी आहे. आणि तें तसें धरलें म्हणजे व्युत्पत्तीवरूनही लत्तनूर किंवा लत्तलूर हें राष्ट्रकूटांचें किंवा रट्टांचें मूळ गांव असें ठरतें. लत्तनूर पासून लतलौर व लातूर हीं रूपें कशीं तयार होतात हें डॉ. फ्लीट यांनीं इतरत्र दाखविलें असल्यानें त्याची पुनरुक्ति येथें करीत नाहीं.[१]

अशा तऱ्हेनें भाषाशास्त्राच्या दृष्टीनें जरी जुनें लत्तनूर व नवें लातूर हीं एक ठरलीं तरी प्रत्यक्ष त्या गांवीं जाऊन वरील तर्कास अनुकूल अथवा प्रतिकूल पुरावा मिळतो कीं काय हें पाहणें आवश्यक असल्यानें मी तेथें गेलों व सांगण्यास आनंद वाटतो कीं, मला डॉ. फ्लीट यांच्या विधानास अनुकूल असा पुरावा मिळाला. तो असा—पुढें दिलेल्या लेखांत 'अस्ति दिव्यं पुरश्रेष्ठं लत्तलौराभिधानकं। महाजनैः पंचशतैर्व्वेदविद्भिर्न्निषेवितं ॥ देवोस्ति प्रथितस्तत्र नाम्ना पापविनाशनः। यं दृष्ट्वा देवदेवेशं सिध्यंति मनुजा भुवि ॥' असे दोन श्लोक आहेत. यांत लत्तलौर हें एका गांवाचें जुनें नांव आलें आहे व तेथें पापविनाशन नांवाचा देव होता

१ एपि. इंडि. ७.२२७

म्हणून सांगितलें आहे. सध्यां ज्या देवळांत शिलालेखाचा दगड आहे त्यास भूतनाथ म्हणतात. पण या देवळाजवळ जी मोठी विहीर आहे तिचें नांव पापनाशी असें असून हा शिलालेख पूर्वी या विहिरींत होता व विहीरीची अलीकडे जेव्हां दुरुस्ती केली तेव्हां तो या देवळांत आणून बसविला असें तथील लोक सांगतात. तेव्हां लत्तलौर हें नांव लातूर करितांच आलें आहे हें उघड होतें. आणि अशा तऱ्हेनें राष्ट्रकूटांचें मूळचें गांव कोठें व कोणतें होतें ही गोष्ट निश्चित ठरते.

## वाचन[१]

( १ ) .... .... ....
( २ ) .... .... ....
( ३ ) ........ [२]स्वस्त्यस्ति विस्तुतगुणै
( ४ ) कनिधिश्चलुक्यवंशो यशो(शः)कुसुमवासि
( ५ ) तदि—कायः ॥ शंभोरवाप्तजननो जनरं
( ६ ) जनश्रीभूकामिनीविपुलकुंतलमंड
( ७ ) लाभ(भः)॥१[॥*] [३]तस्मिं(स्मिन्)आहवमल्लदेवनृपति
( ८ ) र्ज्जातो पृथिव्या(व्याः) पतिः ॥ तत्सूनुः परमर्दि
( ९ ) देव इति या(यः) ख्यातो महेंद्रप्रभः [।*] तस्या
(१०) त्मप्रभवे जयांकिततनौ भूलोकमल्ले
(११) नृपे [।*] राज्यं शासति रामवत्सुविपुलं
(१२) धर्म्या—भू सुप्रजाः ॥[२॥*] [४]अस्ति दिव्य पुरस्ने
(१३) ष्ठं लत्तलौराभिधानकं । महाजनैः पं
(१४) चशतैर्व्वेदविद्भिर्न्निषेवितं ॥ [३॥*] [४]देवो[ऽ*]स्ति

---

१ प्रत्यक्ष पाहून व ठशांचे सहाय्यानें केलें आहे. पहिल्या दोन ओळी व तिसऱ्या ओळीच्या आरंभींचा कांही भाग मुळीच लागत नाही. हा सर्व मजकूर लेखशिलेच्या एका बाजूवरील आहे. मितीचा मजकूर वर काल या सदरांत दिला आहे. त्याशिवाय इतर काही शब्द लागतात. पण त्याचें निश्चित स्वरूप समजत नसल्यानें ते येथें दिले नाहींत.

२ वसततिलका वृत्त ३ शार्दूलविक्रीडित वृत्त. ४ अनुष्टुभ्वृत्त

(१५) प्रथितस्तत्र नाम्ना पापविनाशनः । यं
(१६) दृष्ट्वा देवेदेवेशं सिध्यंति मनुजा भुवि ॥ [४॥*]

२

**उपलब्धि**–हा लेख लातूर गांवाच्या पश्चिमेस असलेल्या सिद्धेश्वराच्या देवळांत मंडपांतील पिंपळाच्या बुंध्यापाशीं व त्यांत घट्ट बसलेला असा आहे. यावर घाणीचा जाड थर बसला असल्यानें अक्षरें खोल खोदलीं असूनही अस्पष्ट झालेलीं आहेत.

**वर्णन**–लेखशिलेची लांबी रुंदी २′, ७″ व १′, १″ ते १′, ४″ आहे. आरंभीं योनीसह लिंग व वाममुख नंदी असून त्याखालीं १० ओळी लेख आहे. लेखाखालीं पुन्हां मोकळी जागा आहे.

**अक्षरवटिका, लेखनपद्धति, भाषा**–लेखांतील अक्षरांचें स्वरूप सामान्यतः शकाच्या १२।१३ व्या शतकांतील नागरी आहे. सर्वत्र पृष्ठ मात्रा आहे. श बद्दल स ( स्रीसिद्धेस्वर ओ. १ ) व ब बद्दल व ( व्राह्मण ओ. ४ ) वापरला आहे. भाषा संस्कृत आहे.

**स्थल व काल**–कालाचा उल्लेख नाहीं. स्थलाविषयीं शंका आहे.

**सार**–सिद्धेश्वर देवालाच म्हणून ३६ निवर्तनें जमीन दिलेली आहे. ब्राह्मण व तपस्वी यांचाही तीवर अधिकार नाहीं असें सांगितलें आहे.

**वाचन**[1]

( १ ) स्री सिद्धेस्वरदेवस्य वसते
( २ ) हा र ने य अकरधारो[2] अ[2]-
( ३ ) री एं ग्रोमें हलं निवर्त्तनानि ३६
( ४ ) प्रतिपालनयिम् । व्राह्म
( ५ ) णतपोधनानामधिका
( ६ ) रो [2]नास्ति । [3]स्वदत्तां परदत्तां
( ७ ) वा यो हरेत्त(त) वसुंधरीं(रां) षष्ठी[ष्टिं]
( ८ ) वर्षसहस्राणि विष्ठां(ष्ठा)यां
( ९ ) जाया(य)ते क्रि(कृ)मि(मिः) । मंगल मह
(१० ) श्री ऽ ॥

---

१ ठशावरून केलें आहे. २ या अक्षराविषयी शंका आहे.
३ अनुष्टुभ् वृत्त

*

# Summary of Articles.

( G. H. KHARE )

## 9 *

Ś 1086.—Sāvargaon (Tuljapur, Usmānābād, Nizam's dominions) Marāthī inscription of Kadamba Māraḍadēva (p. 1).

Date—सकु १०८६ तारण संवत्सरे आश्विन सुध १ गुरौ ( A. D. 1164 Sept. 19 )

It first mentions the tributary prince Kadamba Māradadēva Rānaka and then his two officers Mādhava Nāyaka and Lāhimpa Nāyaka who granted 2 *damas* per month for (the upkeep of ) the temple of Ambādēvī.

## 10

Two Marāṭhī inscriptions from Nēvāsā (Ahmadnagar) ( p. 3 and 5 ).

1

S'. 1161.—In a private house near the Mōhinīrāja temple in Nēwāsā Khurd.

Date—शकु ११६१ विकारी संवत्सरे (A D. 1239)

The hereditary worshiper of Kanairēśvara was sīlū Pandita who belonged to the Mādhyandina branch (of white Yajurvēda) and Śaunaka *gotra.* 18 *nivartanas* of land within the limits of Pāmpūvīhari (Pimprī) were granted to the said God.

2

Near the Nārada temple in Nēwāsā Budruk. No date.

Here it is given that to build stone monasteries and to give water to the poor is the store of merit.

---

* Continued from the number of the last article in the previous volume.

## 11

S'. 1207.—Pūr (Sāswad, Poona) Marāṭhī inscription of (Yādava) Rāmacandra (p. 5)

Date—सकू १२०७ वर्षे प (पा) र्थिव सवछरे आस्विन (ना) दौ

Here mention is made of (Yādava) Rāmacandra, his subordinate Hēmādi Pandita, the keeper of accounts, and some officers, whose names are not quite legible

## 12

Two more inscriptions from Veḷāpūr (Sholapur) (p. 7 and p. 8).

1

Notice of a much damaged Jaina inscription in the village.

2

S'. 1222.—On a slab to the south of the village.

Date—शकु १२२२ सर्वरी सं{व}स(त्स)रे ज्येष्ठादौ.

Here are mentioned the King (Yādava) Rāmacandra, his subordinate Jōideva, his subordinate Brahmadéva Rānē and his brother Bāidēva Rāna who built a monastery and some rooms near Vatēśvara at Velāpura in Māṇa country. The writer was Māidēva, the son of Dāmōdara Pāṇḍita.

## 13

S'. 1055.—Asōgē plates of Kadamba Jayakēśin (III of Goa[1]) (p. 9).

Revised text, with some remarks on the description, characters and orthography of the plates, is given here after examining the original[1].

1. For the summary of these plates, the reader is requested to refer to the Sources of the Mediaeval History of the Dekkan vol I p. 92.

## 14

S'. 732 ( 731 ).—Babulāvāda (East Khandesh) plates of Rāstrakūta Gōvinda (III) ( p. 13 ).

Date—( ll. 40-42 ) शक नृपकालातीतसंवत्सरशतेषु सप्तसु द्वातृं( त्रि ) शदधिकेषु सर्व्वधारी नाम्नि संवत्सरे अ( आ )षाढ बहुल अमावास्यां सूर्यग्रहणपर्वणि ( A. D. 809 July 16, when there was a solar eclipse visible in India).

As regards the main part, these plates have all the verses found in the Nesarī plates[1] excepting nos. 7, 12, 14, 16, 19, 21-25 of the latter.

Gōvinda III, while at Mayūrakhandī granted the village Bahulāvāra to Mahi(hī)dharabhatta who belonged to the Vatsa *gotra* and was residing at Nimva(ba)sthali.

Arunāditya, the son of Vatsarāja wrote the grant and Vādaiyya was the messenger.

## 15

S'. 520.—Bōrgaon (Nizam's dominions) spurious plates of Cālukya Vikramāditya (II) (p. 23).

Date—(ll 33-36) विंसत्युत्तरपंचसतीशु सकवर्षप्रतितीशु...आनंद संवत्सरे . पाल्गुणप्रासमावास्या व्यतीपातविरुध्वातिवारे सूर्य्यग्रहणे (No solar eclipse was visible in India at the time. )

In the Cālukya family was born Pulakēśin ; his son Kīrtivarman; his son Vikramāditya; his son Vinayāditya, who first took the kingdom of the Pallavas and then Kāñcī and subdued the Cēras, Cōlas and Pāndyas; his son Vikramāditya who subdued the Kings of Kaimkala, Mālava and Kalinga.

This Vikramāditya granted to Gōvardhana ? of the Kāśyapa *gotra* the village Nagarśaigē (Nāgarasōgē), which had been already given to this and other brāhmans.

Śrī Rāmapunya-Vallabha, the grand minister of peace and war, wrote the grant

---

1. Sources of the Mediaeval History of the Dekkan vol. I p. 18.

## 16

A Note on the Daulatābād plates[1] of Cālukya Jayasiṁha II (p. 31).

In this note both the village which was granted and the villages which surrounded it, are identified.

## 17

S'. 888.—Parbhani (Nizam's dominions) plates of Cālukya Arikēsarin (III) (p. 33).

Date—(ll. 38–39) शकाब्देष्वष्टाशीत्यधिकेष्वष्टशतेषु गतेषु [प्रव]र्त्तमान-क्षयसंवत्सरवैशाखपो (पौ)र्णमास्या (स्या) बुधवारे (A D. 966 April 8)

In the Cālukya family which belonged to the solar race, was born Yuddhamalla, who (1) ruled on a quarter and one lack country, (2) caused to bathe his elephants in oil at Pōdana and (3) protected Vengi with the three Kalingas; his son Arikēsarin (I); His sons Narasimha or Narasiṅgha (I) and Bhadradēva; Narasimha's son Baddiga, who confined Bhima, who on his part pierced Sangama, in a seafight; his son Yuddhamalla (II); his son Narasingha (II); his son Arikēsarin (II), who married Lōkāmbikā belonging to the Rāstrakūta family; their son Bhadradēva or Badyaga, who caused the construction of Śubhadhāma-Jinālaya; his son Arikēsarin (III), whose capital was Lembulapātaka and who was the donor of the present grant.

To the Gauda-Sangha belonged Yaśōdēva; his disciple Nēmidēva; his disciple the poet Sōmadēva, the author of Yaśōdharacarita, Syādvādōpanisat and other witty verses.

Arikēsarin, the vassal of Rāstrakūta Krisna Rāja (III) granted to the above-mentioned poet Sōmadēva, the village Vanikatupulu for the sake of partial repairs, new plastering, Bali and other offerings to the shrine Śubhadhāma-Jinālaya situate in the capital Lembuḷapāṭaka.

The grant was composed by the poet Peddana and engraved by Rēva of the Śubhadhāma-Jinālaya.

---

1. For the originals the reader may refer to the Hyderabad Archaeological Series No 3, of 1917.

## 18

Ś. ( 1121 ).—Two Kanarese inscriptions from Puḷuñja ( Pandharpur, Sholapur ) ( p. 56 )

1

Date—सीद्धार्थि संव्रत्सरद माघ सु ११ सोमवार व्यतिपातदंदु ( A. D 1200 Jan. 28 )

After extoling the God Siddha-Sōmadēva and his devotee Ammidēva, the inscription goes on to record several grants to the God made by the Mahājanas of Puluñja, Yādava Singhana, the Sāhanis Sankēya and Dēvēya, Dāyiva-Nāyaka, Sōidēva, Gangidēva, Samkamadēva, Bijja Rānē, Khēyidēva and Jōideva. Then it introduces a tributary prince Vikramāditya who built the temple of Vīra Nāgarasa and records various grants made by Siriyādēvī, the wife of Vikramāditya, the prime minister Simhēya Sāhani, the favourite royal hunter Tipurēya-Nāyaka, Rāyasetti, Jōisetti, Isayya-Nāyaka, the private hunter of the prime minister, Vāmana-Nāyaka Lāhidēva-Nāyaka and Tammayya-Nāyaka.

Cāmundarasa, the accountant of Dāmōdara the general, wrote the record.

2

Date—यादव ..सि [ ह ] ... षेद २७ नेय व्यय सं [ व ]. .. ( The date shows that Singhana ascended the throne in Ś. 1122 )

## 19

Ś. ( 1095 ).—A Kanarese inscription from Bhivghāt (Satara) ( p. 71 )

Notice of a damaged inscription apparently written, partly during the reign of Kaḷacurya Sōyidēva and partly during the reign of his brother Sankamadēva, in which occurs the praise of the God Bhīmadēva or Bhīmanātha situate in Bhandivana and then records some grants made to the God within the limits of two villages Karajaya-Khēḍa and Nāravigāvē belonging to the Pāḍē country.

## 20

4 inscriptions from Ter ( Usmānābād, Nizam's dominions ) ( p. 74 ).

1

On the pedestal in the temple of Trivikrama ; undated ; mentions that the pedestal was the work of Kālabhairava who had the biruda, the son of Vārimallōja, and was the servant of a tributary prince Jōgamarasa.

2

S'. 1086.—On a slab resting against the plinth of Mārutī temple to the east of the village.

Date—शकु १०८६ .. सुभानु संवत्सरांतर्गत वैसाख शुद्ध त्रयोदश्यां गुरौ ( A. D. 1163 April 18 )

This inscription though much damaged is in Marāthī and seems to record some grants of land in *nivartana* measure.

3

S'. 1313.—On a pedestal in the Jaina Caitya outside the village.

Date—शके १३१३ [प्रजापति] संवत्छरे फाल्गुन वदि ११ बुधवारे ( A. D. 1392 March 20 ).

The pedastal was dedicated by......Vidyānanda, the disciple of Pūjyapāda who had been there at the time of the repairs of the Vardhamāna Caityālaya belonging to Mūla-Sangha.

4

S'. 1520.—Notice of a damaged inscription in the same Caitya.

Date—शके १५२० विलंबि संवत्सरे भाद्रपदे मासि शुक्लपक्षे पंचम्यां शनौ ( A. D. 1598 August 26 ).

The inscription seems to refer to the Caityās of Vardhamāna and Parśvanātha and to the village Ter, in the form Tair or Ter.

## 21

Two inscriptions from Lātūr (Usmānābād Nizam's dominions) (p. 84).

1

S'. 1049.—In the temple of Bhūtanātha.

Date—शक नृपकालात् एकोनपंचाशदुत्तरे वत्सरसहस्रे अतीते १०४९ ॥ प्लवंग संवत्सरे फाल्गुने मासि शुक्लाष्टम्या शुक्रवारे (A. D. 1128 February 10)

In the family of Cālukyas was born Āhavamalla (Sōmēśvara I), his son Paramardi (Vikramāditya VI), his son Bhūlōkamalla (Sōmēśvara III). Then the record goes on to extol the God Pāpavināśana situated at Lattalaura, the modern Lātūr. (The suggestion of the Late Dr. Fleet that the ancient Lattalūra or Lattanūra is modern Lātūr seems to be significant and the inscription decides finally the question of the identification of Lattalūra or Lattanūra, which is mentioned in several inscriptions as a place from which Rāstrakūtas and Raṭtas seem to have hailed. The editor suggests that the word Lattanura and Lattalūra can be derived from the Kanarese words Rattanūru and Rattarūru which mean the village of Ratta and Rattas. This derivation, if accepted, shows that even from the point of etymology Lātūr seems to be the original place of the Rastrakūtas and the Raṭtas.)

2

At the temple of Siddhēśvara; undated; but mentions that 36 *nivartanas* of land were granted for the upkeep of the temple.

# सूची.





---

क = कदंब, कु = कुल, गा = गांव, गो = गोत्र, चा = चालुक्य, ती = तीर्थंकर, दे = देव, न = नदी, ना = नाणें, प = पर्वत, ममं = महामंडळेश्वर, या = यादव, रा = राजा, रारा = राष्ट्रकूट राजा, लो = लोक, वि = विषय

क = कदंब, कु = कुल, गा = गांव, गो = गोत्र, चा = चालुक्य, ती = तीर्थंक
दे = देव, न = नदी, ना = नाणें, प = पर्वत, मर्म = महामंडळेश्वर, या = याद
रा = राजा, रारा = राष्ट्रकूट राजा, लो = लोक, वि = विषय

क = कदंब, कु = कुल, गा = गांव, गो = गोत्र, चा = चालुक्य, ती = तीर्थंकर दे = देव, न = नदी, मा = माणें, प = पर्वत, मम = महामंडलेश्वर, या = यादव, रा = राजा, रारा = राष्ट्रकूट राजा, लो = लोक, वि = विषय,

क = कदंब, कु = कुल, गा = गांव, गो = गोत्र, चा = चालुक्य, ती = तीर्थंकर, दे = देश. न = नदी, मा = मार्ग, प = पर्वत, मर्म = महामंडलेश्वर, या = यादव, रा = राजा, रारा = राष्ट्रकूट राजा, लो = लोक, वि = विषय

क = कदंब, कु = कुल, गा = गांव, गो = गोत्र, चा = चालुक्य, ती = तीर्थंकर, दे = देव, न = नदी, ना = नाणें, प = पर्वत, मर्म = महामंडलेश्वर, या = यादव, रा = राजा, रारा = राष्ट्रकूट राजा, लो = लोक, वि = विषय

# भारत-इतिहास-संशोधक-मंडळ-पुरस्कृत-ग्रंथमाला

ह्या मालेंतील ग्रंथ सभासदांस मोबदल्यांत मिळत नाहींत; सवलतीनें मिळतील.

(१) मठगांवचा शिलालेख आणि ब्राह्मण सामंत राजवंश (पृ. २४३–रा. ब. वा. अ. बांबर्डेकर. रु. २ व रु. १८१४)
(२) पर्णालपर्वतग्रहणाख्यानम् (मूळ व भाषांतर)=शिवाजीची पन्हाळ्यावरील स्वारी (पृ. ५०–स. म. दिवेकर. रु. ०१० व ०८)
(३) श्री शिवभारत (कवीद्र परमानन्दकृत) मूळ व मराठी भाषांतर (पृ. ५०९ –स. म. दिवेकर. रु. ६ व ५०१२)
(४) शिवचरित्रप्रदीप (पृ. ३२५– द. वि. आपटे. व स. म. दिवेकर, कागदी व कापडी. रु. ३॥ व ४ आणि रु. ३। व ३॥)
(५) हिंदी शिल्पशास्त्र भाग १ ला. (पृ. २००–कै. रा. सा. कृ.वि.वझे रु.३ व रु.२)
(६) शिवकालीन जंत्री शके १५५१–१६५० (पृ. २००–कै. ग. स. खरे रु. ५)
(७) साधन–चिकित्सा (पृ. ३२०–वा. सि. बेन्द्रे. रु. ३॥ व रु. ३)
(८) ऐतिहासिक पोवाडे (पृ. ६१५–य. न केळकर. रु. ३ व रु. २॥)
(९) वाठारकर निंबाळकर–इतिहास (पृ. ३०० रु. १॥ व १०३०३)
(१०) भूतेश–आख्यान (पृ. ७५ ०१२ व ०१०)
(११) कऱ्हाड, (पृ. ५४–य. रा. गुप्ते, बी. ए. ०८)
(१२) ऐतिहासिक प्रस्तावना (पृ. ६००–कै. वि. का. राजवडे रु. ३ व २०६ ०६)
(१३) राजवाडे यांचे संकीर्ण निबंध (पृ. २९१ श्री. शं. ना. जोशी रु. २ रु.१॥)
(१४–१६ तयार नाहींत.)
(१७) पुरंदरे–दप्तर, भाग २ रा. उत्तर पेशवाईतील पत्रव्यवहार (रु. ३ व रु. २॥)
(१८) The Deliverance or the Escape of Shivaji the Great from Agra (R. S. G. K. Deshpande रु. ३ व रु. २॥)
(१९) लोककथा, पुस्तक १ लें (शं. ग. दाते कापडी कागदी रु.१॥ व रु.१, १। व ०१४)
(२०) पानसे घराण्याचा इतिहास (रा. ब. पानसे रु. ३ व रु. २॥)
(२१) कै. वासुदेवशास्त्री खरे–चरित्र (दा. मो. भट रु. २॥ व रु. २।-)
(२२) लोककथा भाग२रा. (पृ.८०–श्री. शं.ग. दाते रु.१०८ व १०४ व १०४व०१४)
(२३) संपूर्ण भूषण (पृ. २३०–श्री. रा. गो. काटे–रु. १०८ व १०४)
(२४) शिवचरित्रसाहित्य खंड ३ रा (पृ. २८२–श्री. शं. ना. जोशी व श्री ग. ह. खरे रु. ३ व रु. २०८).
(२५) राजधानी रायगड (पृ. १६४–श्री. वि. वा. जोशी. रु. १ व ०१२)
(२६) Shivaji the Founder of Maratha Svaraja (pp. 410 –C. V. Vaidya Rs. 3 and Rs. 2-8-0)
(२७) आळंदी (पृ. २०–श्री. ग. ह. खरे ०२)
(२८) मठगांवचा शिलालेख आणि कुडाळप्रांताचा प्राचीन इतिहास (पृ. १६५– अ. ब. वालावलकर रु. १०२ व ०१२)
(२९) पुरंदरे दप्तर भाग ३ रा (पृ. २५०–श्री. कृ. वा. पुरंदरे ३ रु. व रु. २०८)
(३०) मध्वमुनीश्वराची कविता (पृ. २५८–श्री. प्र. त्र्यं. गुळमी ३ व २०८)
(३१) मराठ्यांच्या उत्तरेकडील मोहिमा (पृ. ९०–श्री. वि. गो. दिघे रु. १ व ०१२)
(३३) ज्ञानप्रदीप (पृ. १२५–प्रो. द. वा. पोतदार रु. १ व ०१२)

## Ready for Sale.

---

We have got a few sets of the following books for sale at a considerably reduced price. We hope the public will take advantage of the opportunity.

No. I Selections from the Bombay Secretariat Records: Home Series Vol. I (Surat letters 1630-1700; Bombay letters 1677-1742; Surat Diaries 1660-1781); pp. 450; price Rs. 5.

No. II Selections from the Bombay Secretariat Records: Home Series Vol. II (Bombay Diaries 1722-1788 with 7 appendices); pp. 450; price Rs. 5.

No. III Index to Selections (Bombay Secretariat Records); Maratha Series Vol. I Part I, II, III; Home Series Vol. I and II; price Re. 1.

No. IV Selections from 'Travels and Journals' (From the Bombay Secretariat Records) pp. 253; price Rs. 4.

The whole set will be sold for Rs. 10 and the members of the Bharata Itihasa Samshodhaka Mandala will get it at the concession rate of Rs. 5 per each.